बक्षीस देण्यास, लायब्ररयांकरितां घेण्यास आणि शाळांत
**चालविण्यास मंजूर केलेलें पुस्तक**

# नीतिबोध.





हें पुस्तक

**' चेंबर्स मॉरल् क्लास–बुक ' व इतर पुस्तकें**

यांच्या आधारानें

**हरि कृष्ण दामले**

यांनीं लिहिलें.

' उपदेशाच्या अथवा उदाहरणांच्या योगानें मुलांचे वर्तनावर संस्कार होईल अशा प्रकारचीं पुस्तकें शाळांत चालविलीं असतां शिक्षकांविषयीं मुलांची पूज्यबुद्धि वाढत जाऊन नीतीचा प्रसार अधिक होईल असा संभव आहे. '— शिक्षणाच्या सुधारणेवर हिंदुस्थानसरकारचा ठराव, सन १८८९.

**आवृत्ति आठवी**

सन १९३१.

**किंमत ६ आणे.**

कै० वे० शा० राजमान्य राजश्री

**रावजी सदाशिव शास्त्री गोडबोले**

यांची

थोर विद्वत्ता, लोकोत्तर नीतिमत्ता, शुद्ध व पवित्र

आचरण, धार्मिकता, औदार्य, मित्राचे ठायीं

अकृत्रिम प्रेम, इत्यादि अनुकरणीय गुणांचें

आल्हादजनक जें स्मरण

त्यास

हें लहानसें पुस्तक त्याच्या कर्त्यानें

परमादरानें

अर्पण केलें आहे.

# OPINIONS.

" Mr. Hari Krishna Damle's ' Nitibodha ' is compiled upon the model of Chambers' Moral Classbook, and some of the stories in it are taken from that book. Chambers' Moral Class-book was taught in Government English School when I was a schoolboy, and from my individual experience I feel myself in a position to state that such books are calculated to give a very healthy tone to the mind of the pupil. I am therefore of opinion that Mr. Damle's book should be introduced into Vernacular and Anglo-Vernacular Schools. Mr. Damle's Marathi style is chaste and simple, and compares favourably with that of the Marathi Translation of Chambers' book, which never became popular on account of its heavy and uncouth style. "—*Dr. R. G. Bhandarkar, M. A. Ph. D., C. I. E.*

---

" Your Marathi Moral Class-book is a very useful little work. It will serve as a good First Moral Reader in Marathi and Anglo-Vernacular Schools. It may also be found useful for translation in High Schools, and may there also indirectly impart moral instruction. "—*V. A. Modak, Esq., B. A., Late Principal, Elphinstone High School, Bombay.*

---

" I am very glad to tell you that I am very favourably impressed with this new production of yours, both as regards its form and matter. The style is simple and graceful, and young boys and girls will easily understand it. The matter is such as it ought to be in a book like this. Some of the stories are exceedingly touching, and I feel certain that they will not only move the heart of the young reader, but will also impress upon his mind the importance of the virtues which they illustrate, and produce in him the inclination to imitate, the examples of virtue set before him. For this reason I hope the ' नीतिबोध ' will soon be introduced as a reading-book side by side with the Department Series in the lower Marathi Standards

by the Managers or Head Masters of public and Private Schools, as they must know how essential it is to put such interesting moral books into the hands of boys and girls. The 'नीतिबोध' may also be used as a very convenient book for translation into English in the higher Standards of our High Schools."—*G. G. Agarkar, Esq., M. A. Late Principal, Fergusson College, Poona.*

---

"Mr. Hari Krishna Damle, has, by the publication of his new work entitled 'नीतिबोध,' made a very valuable addition to the Marathi literature in an important department. The want of a book conveying the principles of practical morality in a simple and agreeable style had long been felt, and suggestions were made from several quarters for the compilation of such a work. Mr. Damle may therefore be congratulated upon having successfully supplied this want and upon his having rendered an important service to the Vernacular of his country by his present little work, the matter as well as the style of which are both really commendable."—*L. K. Chiplunkar, Esq., B. A. Late Head Master, High School, Akola.*

---

"I have read your new book called 'नीतिबोध.' I like the way in which you have adapted the lessons in the original. I also approve your selection of oriental stories. I wish the selection was larger. But even as it is, the book is a good one, and well calculated to serve the moral purpose it is intended to do. I need not add your diction is pure and idiomatic."—*Rao Saheb V. M. Mahajani, M. A., Late Educational Inspector, Hyderabad Assigned Districts.*

---

"I like the book very much, and I am of opinion that it will be very useful as a general reading-book in the lower classes of Vernacular Schools and also as a prize-book."—*D. R. Tarkhadkar, Esq., Head Master, High School, Nasik.*

---

"Your 'Nitibodha' is a good specimen of the sort of books that may be read with advantage in Marathi and Anglo-Marathi Schools. The stories are all well chosen, well arranged, short and pithy."—*W. T. Kapse, Esqr., Supdt., State Education, Dhar.*

Its value as a good reading-book cannot be overrated. It deserves being placed in the hands of every boy, and I am sure wise parents and sensible teachers will never lose this opportunity of seeing that he has this welcome gift. "—*Narayan Bhikaji, Esq., Head Master, Zilla School, Hinganghat, C. P.*

---

"I read your book and was very much pleased with its style and contents. The book will be very useful as a class-book, both in Vernacular and Anglo-Vernacular Schools, and also as a prize book."—*Govind Shankar Shastri Bapat, Esqr., Sanskrit Tutor, Elphinstone High School, Bombay.*

---

" आपलें ' नीतिबोध ' पुस्तक मी वाचून पाहिलें. विषयांची निवड फार चांगली केली आहे. भाषा गोड, शुद्ध आणि सरळ आहे. उदाहरणें संयुक्तिक आहेत; आणि त्यांचें तात्पर्य चटकन मनांत उतरावें अशी योजना केली आहे—म्हणजे नीतीचा बोध मनांत ठसण्यास जीं साधनें आवश्यक आहेत तीं सगळीं ह्यांत आहेत. आणखी, आमच्या सध्यांच्या तरुण मंडळीस सन्मार्ग प्रदर्शित करण्यास हें पुस्तक उपयोगी पडेल, अशी माझी खातरी आहे. मराठींतल्या नीतिग्रंथांत आपण उत्तम प्रकारची भर घालीत आहां हा आमच्या महाराष्ट्रावर मोठा उपकार आहे. "—**रा. रा. विनायक कोंडदेव ओक.**

---

" नीतिबोध.—रा. रा. हरि कृष्ण दामले यांनीं इंग्रजी ' मॉरल क्लास-बुक ' ह्या पुस्तकाच्या आधारानें लिहिला आहे. विषययोजना आणि भाषापद्धति ह्या दोन्ही फार चांगल्या आहेत. हा अवश्य संग्रहीं असावा, आणि सर्वांनीं वाचावा. "—**बालबोध.**

---

" रा. दामले यांची भाषापद्धति साधी, शुद्ध व मनोहर असते हें त्यांच्या आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांवरून सर्वांस माहीत आहेच, व त्याप्रमाणेंच हेंही पुस्तक सर्व प्रकारांनीं फार नामी उतरलें आहे.... यांत उदाहरणाकरितां ज्या गोष्टी घेतल्या आहेत त्या सर्वच चांगल्या आहेत, तथापि त्यांत कित्येक फारच हृदयद्रावक व मनोरंजक आहेत. हें पुस्तक वाचतांना यांतील नीतितत्त्वाचा ठसा वाचणाऱ्यांच्या मनावर सहज बसण्यासारखा आहे. सारांश,

हें पुस्तक मुलांच्या व मुलींच्याही शाळांतून वाचनाकरितां नेमण्यास व बक्षीस देण्यास फार योग्य आहे. "—सुधारक.

" रा. दामले यांनीं केलेलें पुस्तक म्हणजे त्याच्या भाषासौंदर्याविषयीं वेगळें सांगण्याचें कारण नाहीं. शाळाखात्यांत नीतिशिक्षणाची फार अवश्यकता आहे असा हिंदुस्थानसरकारचा १८८९ सालीं जो ठराव झाला आहे, तो लक्षांत आणून रा. दामले यांनीं हें तयार केलें आहे....शालोपयोगी नीतिग्रंथाची द्विरावृत्ति निघायाला पाहिजे होतीच, ती येणेंप्रमाणें वेगळ्या भाषांतरानें व विशेष सुधारून निघाली हें चांगलें झालें. ' नीतिबोध ' हें पुस्तक शाळाखात्यांत चालू करण्यासारखें बालबोध पुस्तक झालें आहे....मुलांमुलींच्या शाळांतून वाचनपुस्तक म्हणून चालू करण्यासारखा हा ' नीतिबोध ' ग्रंथ आहे, व सर्व आबालवृद्धांच्या संग्रहीं तो रहावा अशी त्याची योग्यता आहे." —ज्ञानचक्षु.

# प्रस्तावना.

नीति या शब्दाचा अर्थ फार व्यापक आहे. तो निरनिराळ्या काळीं व निरनिराळ्या प्रसंगीं भिन्न भिन्न घेतलेला आढळतो. परंतु प्रस्तुत स्थळीं त्या सर्व अर्थांचा विचार कर्तव्य नाहीं. नीति या शब्दाचा सांप्रत जो सहज अर्थ मनांत येतो, तेवढ्यापुरताच प्रस्तुत स्थळीं विचार करणें आहे. याप्रमाणें म्हटलें म्हणजे या शब्दाचा अर्थ व्यवहारांत चांगल्या रीतीनें वागणें होय. व्यवहारांत चांगल्या रीतीनें वागणें म्हणजे जेणेंकरून दुसऱ्याचें नुकसान न करतां आपणांस, आपल्या आप्तांस, देशबांधवांस वगैरे आपल्याकडून सुख होऊन आपली मानमान्यता होईल अशा रीतीनें वागणें होय. यांत अनेक गोष्टींचा समावेश होतो. त्यांपैकीं आरोग्यरक्षण, उद्योग, परोपकार, सहनशीलता, कर्तव्यकर्म, प्रामाणिकपणा इत्यादि गोष्टी मुख्य होत. आरोग्यरक्षण केल्यानें आपल्या शरिरास सुख होईल. उद्योग केल्यानें आपणांस अन्नवस्त्राची ददात न पडून अनेक सुखें आपणांला प्राप्त होतील. परोपकार, सहनशीलता, कर्तव्यकर्म जाणणें व तें करणें, प्रामाणिकपणानें वागणें इत्यादि गोष्टींच्या योगानें आपल्या स्वतःच्या अंतःकरणास आनंद होऊन लोकांत आपली मानमान्यता वाढेल. सारांश, अशा प्रकारें चांगल्या रीतीनें वागणें—म्हणजे नीतीनें वागणें—हें जगांत मनुष्यास अत्यंत आवश्यक व सुखकारक आहे. ह्या वर सांगितलेल्या गोष्टींपैकीं कित्येक गोष्टींची थोडथोडी उपपत्ति व उदाहरणें देऊन, त्या गोष्टी वाचणाऱ्यांच्या मनांत ठसविण्याचा या पुस्तकांत यत्न केला आहे.

शिक्षणाच्या प्रसाराबरोबर नीतीचाही प्रसार होत गेला तरच

देशाचें खरें हित होणार आहे. परंतु या संबंधानें पाहिलें असतां हल्लींचा प्रकार कांहीं समाधानकारक नाहीं असें अनुभवास येत आहे व या गोष्टीकडे सरकारचें व लोकांचें लक्ष लागलें आहे. कांहीं वर्षांपूर्वीं हिंदुस्तानसरकारनें या विषयावर जो ठराव प्रसिद्ध केला—ज्यांतील वाक्य या पुस्तकाच्या मुखपृष्ठावर घातलें आहे—त्यांतील उद्देश लक्षांत आणून हें पुस्तक तयार केलें आहे.

इंग्रजींत ' मॉरल क्लास-बुक ' या नांवाचा जो प्रसिद्ध व सर्वमान्य ग्रंथ आहे, त्याच्या व दुसऱ्या कांहीं पुस्तकांच्या आधारानें हें पुस्तक लिहिलें आहे. ' मॉरल क्लास-बुकाचें ' एक भाषांतर पुष्कळ वर्षांपूर्वीं प्रसिद्ध झालेलें आहे. परंतु तें केवळ शब्दशः केलेलें असून, त्या वेळच्या व हल्लींच्या पुस्तकाचा उपयोग मूळ इंग्रजी ग्रंथ शिकणारांशिवाय दुसऱ्यास फारसा होण्यासारखा नाहीं. शिवाय, तें पुस्तक हल्लीं कोठें मिळतही नाहीं. असो; मूळ इंग्रजी ग्रंथांतून सरकारी क्रमिक पुस्तकांत वगैरे ज्या गोष्टी घेतलेल्या आहेत, त्या प्रस्तुत पुस्तकांत आणखी न घेतां दुसरीकडच्या कित्येक घातल्या आहेत. तसेंच मूळ इंग्रजी ग्रंथांतले सर्व विषय न घेतां फक्त नऊच निवडून घेतले आहेत. मूळ ग्रंथांतल्या व इतर इंग्लिश पुस्तकांतल्या ज्या गोष्टींशीं इतिहासाचा संबंध आहे, तेवढ्यांतील नांवें वगैरे मात्र तशींच ठेविलीं आहेत; बाकीच्यांतील नांवें बदलून त्या गोष्टींस आपलेकडील रूप दिलें आहे. आतां कोणी म्हणतील कीं, ह्या सर्व गोष्टी आपलेकडच्याच असत्या तर याहून चांगलें झालें असतें. पण मूळ ग्रंथकाराच्या देशांतील विद्याप्रसार, उद्योग, ऐश्वर्य इत्यादिकांच्या योगानें पाहिजे त्या विषयावर हवीं तितकीं उदाहरणें जशीं त्या ग्रंथांत देतां आलीं आहेत, तशीं इकडे सांपडणें बरेंच कठिण आहे. तथापि इकडील उदाहरणेंहीं कांहीं दिलीं असून तिकडचीं उदाहरणेंही सुबोध करवतील तितकीं

करण्याचा होईल तितका प्रयत्न केला आहे. यावरून ज्या उद्देशानें हें पुस्तक लिहिलें आहे तो उद्देश सिद्धीस जाईल अशी पुस्तककर्त्यास आशा आहे, व त्याप्रमाणें तो सिद्धीस गेल्यास पुस्तककर्ता आपल्या श्रमांचें साफल्य झालें असें मानील.

पुणें, ता० २३ सप्टेंबर सन १८९१. **हरि कृष्ण दामले.**

---

## आवृत्ति २ री.

हें पुस्तक मे० डायरेक्टरसाहेब, विद्याखातें, यांजकडे आश्रयाकरितां पाठविलें होतें. तें त्यांनीं बक्षिस देण्यास, लायब्र्यांकरितां घेण्यास व शाळांत चालविण्यास मंजूर केलें याबद्दल पुस्तककर्ता त्यांचा फार आभारी आहे.

या पुस्तकांत घातलेल्या बहुतेक कविता ‘ बालबोध ’ नामक सुंदर मासिक पुस्तकांतून घेतल्या असून त्या घेण्याची परवानगी सदर पुस्तकाचे कर्त्यांनीं व मालकांनीं कृपा करून दिली याबद्दल पुस्तककर्ता त्यांचा फार आभारी आहे.

पुणें, ता० ३१ जुलै १९००. **हरि कृष्ण दामले.**

---

## आवृत्ति आठवी.

ही नवीन आवृत्ति मागील आवृत्तीप्रमाणेंच छापिली आहे.

पुणें, ता० २० मे १९३१. **विद्याधर हरि दामले.**

# अनुक्रमणिका.



# नीतिबोध.

## आरोग्यरक्षण

हा विषय फार महत्त्वाचा आहे. त्यांतून सांप्रत अनेक कारणांनीं आपल्या देशांतील लोकांच्या शरीरसंपत्तीचा ऱ्हास होत चालला आहे. याकरितां आपणांस तर या विषयाकडे लक्ष देणें फार अगत्याचें आहे. पूर्वी आपल्या वाडवडिलांनीं या गोष्टीकडे विशेष रीतीनें लक्ष दिल्याचें दिसत नाहीं, तथापि या संबंधानें त्यांची स्थिति वाईट होती असें कांहीं म्हणतां येणार नाहीं, तेव्हां त्यांचें जसें चाललें तसेंच आपलेंही चालेल असें म्हणून आपण स्वस्थ बसून राहणें उपयोगी नाहीं. कां कीं, आपण त्यांच्यापेक्षां अगदीं भिन्न स्थितींत आहों. आपणांस इतर कशानें नाहीं म्हटलें तरी, बुद्धिशक्तीनें निदान इतर सुधारलेल्या राष्ट्रांशीं टक्कर मारून, त्यांची बरोबरी करतां आली नाहीं तथापि त्यांच्या जवळ जवळ तरी योग्यता मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे; तसें केलें तरच आपली धडगत आहे. असो, तर ज्या बुद्धीविषयीं वर उल्लेख केला, ती बुद्धि चालावयाला शरीरशक्तीची अनुकूलता पाहिजे, हें सांगावयास नकोच. तेव्हां ती जेणेंकरून चांगली राहील त्या गोष्टीकडे प्रत्येकानें लक्ष पोहोंचविलें पाहिजे. ही गोष्ट विशेषेंकरून विद्यार्थी मंडळीस लागू आहे; कारण त्यांच्यावरच बहुतेक अंशीं देशाचें भावी हिताहित अवलंबून आहे. हल्लीं पहावें तों जिकडे तिकडे फिकट तोंडें, खोल डोळे, बसलेले गाल, हाडांचे सांपळे, खुरटलेली वाढ, क्षयाचीं चिन्हें, अकालिक

मृत्यु, इत्यादि गोष्टी फारच दृष्टीस पडतात. अशा गोष्टींची उपेक्षा करणें अनर्थास कारण होणार आहे.

विद्यार्थ्यांपैकीं पुष्कळजण आपलीं घरेंदारें सोडून परठिकाणीं अभ्यासाकरितां जाऊन राहिलेले असतात. तेथें त्यांची खाण्या-पिण्याची नीट व्यवस्था राहून, त्यांनीं किती वेळ अभ्यास करावा, किती वेळ खेळावें, किती वेळ झोंप घ्यावी, इत्यादि गोष्टींच्या संबंधानें त्यांजवर देखरेख ठेवणारे चौकसनीस इंग्लंड वगैरे सुधारलेल्या देशांतल्याप्रमाणें येथें नाहींत. तर ती सोय होईपर्यंत विद्यार्थ्यांनीं आपली आपणच काळजी घेऊन अभ्यासाच्या व विश्रांतीच्या वगैरे वेळा ठरवून नीट व्यवस्थेनें राहिलें पाहिजे. या संबंधाचे नियम सर्व विद्यार्थ्यांस सारखे लागू पडतील असे देतां येणें कठीण आहे. कां कीं, कोणाची बुद्धि तीव्र असते, कोणाची मंद असते; कोणाची शरीरप्रकृति सुदृढ असत, कोणाची अशक्त असते; कोणाची खाण्यापिण्याची व अभ्यासाची सोय चांगली असते, व कोणाची तशी नसते. तेव्हां ज्यानें त्यानें आपल्या सोईप्रमाणें हे नियम ठरविले असतां त्यांचाच विशेष उपयोग होणार आहे. तथापि कांहीं ठोकळ ठोकळ नियम, जे बऱ्याच अंशीं सर्वांस लागू पडतील असें वाटलें, ते पुढें देतों:—( १ ) शाळेची वेळ शिवाय करून दररोज सुमारें एकंदर सहा तास मन लावून अभ्यास करीत जावा. ( २ ) पेटी किंवा बसकें टेबल पुढें ठेवून एकसारखें लिहीत वाचीत बसल्यानें कंबरेस पोक येण्याचा संभव असतो; याकरितां उंच टेबल व खुर्ची यांचा उपयोग करावा; परंतु लिहिण्याच्या विषयाखेरीज बाकीच्या विषयांचा अभ्यास उभें राहून किंवा इकडे तिकडे फिरून केला असतां त्यापासून फार हित आहे. ( ३ ) लिहिण्याचें टेबल इतकें उंच असावें कीं, आपणांस खालीं वांकावयास पडूं नये; कारण एकसारखें वांकून पाहिल्यानें डाळ्यांस अपाय होतो. ज्यांचे

डोळे अधू असतील त्यांनीं त्यांवर दिव्याची झकाकी पडूं न देण्याविषयीं जपावें, आणि रात्रीं व पहाटेस उठण्याचे वेळीं त्यांना थंड पाणी लावीत जावें. ( ४ ) अभ्यास होईल तितका दिवसास करावा, व रात्रीं फार झालें तर दहा वाजत तोंपर्यंत जागावें, पुढें जागूं नये. पहाटेस मात्र चार किंवा पाच वाजतां तरी निदान उठून अभ्यासास लागावें; कारण ती वेळ अभ्यास करण्याला फार चांगली असते. ( ५ ) दररोज निदान सहा तास तरी झोंप घ्यावी; व दोन तास स्वच्छ हवेंत व्यायाम अवश्य करावा. व्यायामांत तालीम करणें, खेळ खेळणें व रपेट करणें ह्या गोष्टींचा समावेश होतो. याखेरीज पुढें आरोग्यरक्षणाविषयीं सर्वसाधारण नियम दिले आहेत तेही लक्ष्यांत ठेवावे.

सांप्रत आमच्या विद्यार्थी मंडळीकडून या संबंधानें जी हयगय व ज्या चुका होत आहेत, त्या अत्यंत शोचनीय आहेत. एखाद्या शब्दाच्या उच्चारांत थोडी चूक झाली तर त्यांना ती शरमेची गोष्ट वाटते, पण आरोग्यरक्षणाचे ठळक ठळक देखील नियम माहीत नसल्याबद्दल त्यांना लाज वाटत नाहीं ! ' असें वारंवार घडतें कीं, विद्यार्थी आपल्या कोत्या समजुतीमुळें आपली शक्ति किती हें न जाणून, जसजसा ज्ञानाचा अमर्याद समुद्र त्याच्या दृष्टीस पडूं लागतो तसतसा आपल्या पुस्तकांपासून क्षणभरही न हालतां, आपण जाडा विद्वान् होईपर्यंत विश्रांति घ्यावयाचीच नाहीं, असा निश्चय करितो. शरीरप्रकृतीच्या संबंधानें तर पहिल्यापासून त्याजकडून इतकी हयगय होते, आणि तेणेंकरून त्याच्या शक्ति इतक्या क्षीण होतात कीं, पुढें त्याच्यानें मुळींच व्यासंग होईनासा होतो, आणि मृत्यूचें ठाणें आपल्या शरिरांत बसलें आहे असें त्यास लवकरच दिसून येतें. पण उपयोग काय ? एकदां हातचा लगाम गेल्यावर मग काय इलाज चालतो ? याप्रमाणें अनेक होतकरू लोकांवर आजपर्यंत मृत्यूनें

अकालीं धाड घातली आहे. पण येथें हेंही चांगलें लक्षांत ठे
पाहिजे कीं, असें होण्याचें कारण त्यांनीं जिवापाड व्यासंग केल
केवळ नव्हे तर ते आपल्या शरिराच्या आरोग्याविषयीं बेफि
राहिले हेंच फार करून होय. ' *

' परंतु ही एक सुदैवाची गोष्ट समजली पाहिजे कीं, हल्लीं
गोष्टीकडे लोकांचें लक्ष लागत चाललें आहे. मुलांना अतिः
अभ्यास करावयास लावणें गैर आहे अशा अर्थाचे हल्लीं प्रसि
होत असलेल्या कांहीं ग्रंथांत लेख येऊं लागले आहेत. आ
त्यामध्यें कदाचित् थोडीशी अधिकोक्ति असेल. परंतु असल्या लेख
बहुधा ती असावयाचीच. वर्तमानपत्रांतूनही शारीरिक शिक्षणाक
लोकांचें लक्ष लागण्यासारखे निबंध व पत्रें येऊं लागलीं आहे
आणि अलीकडे ' बलवर्धक ' किंवा अशाच अर्थाच्या नांवाच
सभाही कोठें कोठें स्थापन झाल्या असून त्यांमध्यें मुलांबाळां
शरीरप्रकृति चांगली राहण्यास काय केलें पाहिजे ह्याविषयीं विच
होऊं लागला आहे; व ह्यावरून हल्लीं ज्या रीतीनें लोक मुलांबाळांन
जतन करितात त्या रीतीनें त्यांची शरीरप्रकृति रहावी तश
राहात नाहीं ही गोष्ट बऱ्याच लोकांच्या लक्षांत येऊन चुकली आ
असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतां इतकें मात्र खरें कीं, लोकांमध
ह्या विषयाच्या संबंधानें जी चळवळ दिसून येत आहे, ती उत्तरोत्त
जास्त होत जाऊन सर्वांनीं आपल्या मुलांबाळांची स्थिति सुधारण्यास
मनापासून झटलें पाहिजे. '

त्याचप्रमाणें, ' शरीरसंपत्ति चांगली राहाण्यास ज्या गोष्टी अग
त्याच्या आहेत असें लोक मानतात, त्या सर्वांत शरिरास व्यायाम
असणें ही गोष्ट अत्यंत अगत्याची आहे असें अंशतः बहुतेक लोकां

* अवतरणचिन्हांतील मजकूर ' शिक्षणसार ' पुस्तकांतून घेतला आहे.

च्या मनांत वागतच आहे. यास्तव याविषयीं मुलांच्या संबंधानें तरी विशेष चर्चा करीत बसण्याचें कारण नाहीं. मोठमोठ्या शहरांमध्यें सरकारी व खासगी शाळांसभोंवतीं मुलांस खेळण्याकरितां म्हणून बरीच जागा ठेविलेली आपण पाहातों. तसेंच उघड्या मैदानांत धांवण्याचे खेळ खेळण्याकरितां बराच वेळ या शाळांतून राखून ठेवण्याची वहिवाट आहे, व शिवाय असे खेळ मुलांस पाहिजेत ही गोष्टही आतां सर्व लोकांस मान्य झाली आहे. दुसऱ्या कोणत्याही गोष्टीच्यासंबंधानें जरी नाहीं तरी या गोष्टीच्या संबंधानें लोक आतां असें कबूल करतातसें दिसतें कीं, मुलांचे स्वाभाविक कलांस अनुसरून चालण्यापासून फायदाच आहे. सकाळीं व संध्याकाळीं फार वेळ शिकण्याचें काम चाललें असतां मधून कांहीं थोडा वेळ मोकळ्या हवेमध्यें इकडे तिकडे त्यांस फिरूं देण्याची जी सांप्रतची चाल आहे, तीवरून असें दिसून येतें कीं, विद्यार्थ्यांच्या शरीरप्रकृतीकडे लक्ष देऊन तदनुसार शाळेंतील नियम असावे असें आतां दिवसानुदिवस लोकांस वाटूं लागलें आहे.'

असो, आतां या विषयाचा साधारणपणें विचार करूं 'आरोग्य' ह्या शब्दाचा अर्थ शरिराचा निरोगीपणा. शरीर निरोगी असणें म्हणजे त्याचा प्रत्येक अवयव विकाररहित असून त्या सर्व अवयवांचीं कामें सुरळीत रीतीनें चालणें होय. जर पक्वाशयाचे व्यापार सुरळीत रीतीनें चालत असले, काळीज चांगलें टणटणीत असून रुधिराभिसरणाचें काम नीट होत असलें, फुप्फुसास कांहीं व्यंग नसून श्वासोच्छ्वास बरोबर रीतीनें चालत असला, आणि मगज व त्वचा यांस कांहीं विकार नसून त्यांचीं सर्व कामें ठीक चालत असलीं तर शरीर निरोगी आहे असें समजावें. अशा प्रकारें शरीर निरोगी

*पृष्ठ ४ मधील 'परंतु' पासून सुरू झालेल्या कलमापासुन पृष्ठ ६ तील फुलीपर्यंत अवतरणचिन्हांतील मजकूर ' शिक्षणमीमांसा ' पुस्तकांतून घेतला आहे.

असलें म्हणजे मनुष्याच्या मनास आराम वाटतो, व तो आपलीं सर्व कामें आनंदानें करूं शकतो. अशी ज्या मनुष्याची स्थिति असेल तोच वास्तविक सुखी होय, व तशी ज्याची नसेल, त्याला दुसऱ्या सर्व गोष्टी जरी अनुकूल असल्या तरी तो दुःखी होय असें म्हणण्यांत अतिशयोक्ति नाहीं असें विचारांतीं सर्वांना कबूल करावें लागेल.

जगत्कर्त्यानें शरिराची योजना अशी केली आहे कीं, त्याची आपण काळजी घेतली असतां तें मूळचें जसें निकोप असतें तसेंच सतत रहावें. पण आपण त्याची काळजी ठेविली नाहीं तर आपणांस निरोगी राहणें अशक्य आहे. उदाहरण, आपण दररोज खावयाचें त्यापेक्षां अधिक अन्न खात गेलों, अथवा अपकार करणारें अन्न खात गेलों, तर आपल्या कोठ्याला इजा होईल. त्याचप्रमाणें, एकसारखें काळजींत व विचारांत निमग्न राहिलों, तर त्यापासून मगज बिघडेल व काळीज आणि रक्तवाहिन्या यांसही अपकार होईल. सारांश, अशा प्रकारें आपण जर अयोग्य मार्गानें चाललों तर शरीर व्यथित होत जाऊन त्याचीं कामें नीट चालणार नाहींत. याचाच परिणाम रोग होय, व रोगाचा दारुण परिणाम मरण होय. असो; तर तात्पर्य काय कीं, आपण आपलें शरीर निरोगी राखण्याविषयीं सदोदित फार काळजी घेतली पाहिजे म्हणजे यासंबंधानें कांहीं ठळक ठळक नियम करून ते पाळिले पाहिजेत. हें आपल्या आवश्यक कर्तव्य-कर्मांपैकीं एक कर्तव्यकर्मच आहे.

मनुष्यानें आपल्या आरोग्यरक्षणासाठीं जे नियम पाळिले पाहि-जेत, त्यांपैकीं मुख्य मुख्य खालीं सांगतों:—

१. आपली राहण्याची जागा कोरडी व स्वच्छ असून तिच्यांत शुद्ध व ताजी हवा खेळत असावी.

२. दररोज सर्वांग धुऊन स्वच्छ करीत जावें.

३. जें अन्न खावयाचें त्याचा निदान चतुर्थांश तरी स्निग्ध व पौष्टिक अन्न खात जावें, आणि खाण्याचे पदार्थ नेहमीं तेच तेच नसावे—मधून मधून त्यांचा पालट करीत जावा.

४. मिताहार ठेवावा—भूक असेल तेवढेंच खावें, कमी किंवा जास्त खाऊं नये.

५. कोणताही मादक पदार्थ सेवन करूं नये.

६. दररोज निदान दोन तास तरी मोकळ्या व स्वच्छ हवेंत व्यायाम करीत जावा.

७. दररोज आठ किंवा दहा तासपर्यंत मानसिक किंवा शारीरिक श्रमाचें कांहीं तरी काम करीत जावें.

८. दररोज निदान सहा तासपर्यंत झोंप घेत जावी.

९. दुर्दैवेंकरून कांहीं एखादें संकट आलें तर त्याच्या निवारणाचे उपाय करावयाचे ते करावे; पण त्याबद्दल व्यर्थ काळजी वाहून मनाला शिणवूं नये, आणि होईल तितकी सदोदित शांत व आनंदित वृत्ति ठेवावी.

हे ठळक ठळक नऊ नियम सांगितले. यांखेरीज ज्याला त्याला स्वतःच्या शरीरप्रकृतीच्या मानानें व अनुभवाच्या योगानें आणखीही कित्येक करितां येतील. या नियमांप्रमाणें जर सर्व लोक वागूं लागले, तर पृथ्वीवर रोग म्हणून राहणार नाहीं, व त्या योगानें मनुष्यास जें अनिर्वाच्य सुख प्राप्त होईल त्याची कल्पना करणें अशक्य आहे! या संबंधानें दोन तीन गोष्टी सांगतों.

## ओलसर जागेंतील बिन्हाड.

कोणा एका तालुक्याच्या गांवीं रामराव या नांवाचा एक कारकून रहात असे. यानें ज्या ठिकाणीं बिन्हाड घेतलें होतें त्या जागेला ओल अतिशय होती. यामुळें त्याच्या घरांतील बहुतेक

माणसें आजारी असत. कोणाला ताप, कोणाला पडसें, कोणाला खोकला, अशी कांहीं तरी नेहमीं तक्रार असे. एकदां त्याच्या घरीं त्याचा मेहुणा त्याच्या भेटीकरितां आला. हा गृहस्थ शहरांत राहणारा असून, आरोग्य राखण्यास काय केलें पाहिजे हें चांगलें जाणत असे. तो आल्यावर चालीप्रमाणें नमस्कारचमत्कार व कुशलप्रश्न चालले असतां रामराव म्हणतो, 'काय बोवा करावें! येथें बदली झाल्यापासून मला साडेसाती आली आहे. घरांत कोणी ना कोणी आजारी नाहीं असें कधींही नसतें. येथें आल्यापासून वैद्य जो आमच्या पाठीमागें लागला आहे, तो कधींही टळत नाहीं. ही साडेसाती केव्हां संपेल ती संपो!'

रामरावाचा मेहुणा म्हणतो, 'रामरावजी, तुमच्या ह्या बिऱ्हाडाची जी व्यवस्था दिसत आहे तीवरून मला वाटतें कीं, तुम्हांला साडेसाती वगैरे कांहीं नसून तुमचा अविचार हीच खरोखर साडेसाती तुम्हांला आहे! अहो, तुमच्या या बिऱ्हाडाजवळून ओढा वहात आहे, व नजीक दोन मोठमोठाल्या बागा आहेत; आणि घर अगदीं कोंदट व खोलगट जागेंत असल्यानें त्याला ओल तरी किती आली आहे बरें? अशा उत्तम जागेंत तुम्ही रहाल तोंपर्यंत तुमची साडेसाती कधींही संपणार नाहीं.'

रामराव म्हणतो, 'मग काय हें बिऱ्हाड सोडलें म्हणजे आमच्या मागचा हा त्रास चुकेल असें तुम्ही म्हणतां? असें असेल तर उद्यां रविवार आहे. सकाळच्या प्रहरींच मी दुसरीकडे बिऱ्हाड नेतों;–जेवायला सुद्धां येथें राहात नाहीं. पण आजपर्यंतच्या अनुभवावरून तुम्हांला मी खचीत सांगतों कीं, आमच्या पाठीमागचा त्रास कधींही चुकावयाचा नाहीं; कां कीं, मी सदाचाच दुर्दैवी आहें. जेथें जाईन तेथें दुर्दैव हात धुऊन माझ्या पाठीमागें लागलेलें आहे!'

पाहुणा म्हणतो, ' दुर्दैव आणि सुदैव हीं बहुधा अविचाराचीं व विचाराचीं फळें होत. आपण विचारानें व ईश्वरानें लावून दिलेल्या नियमाप्रमाणें वागलों नाहीं तर आपणांवर संकटें आल्या-वांचून कशीं राहतील ! आपलें आरोग्य राखण्याविषयीं जे कांहीं नियम ईश्वरानें आपणांला लावून दिले आहेत, त्यापैकीं कांहीं नियमांप्रमाणें तुम्ही चालत नाहीं यामुळें अर्थातच तुम्हांला विपत्ति भोगावी लागत आहे ! '

शेवटीं त्या गृहस्थाच्या सांगण्यावरून रामरावानें आपलें बिऱ्हाड तेथून काढून चांगल्या कोरडया जागेंत नेलें. तेव्हां चमत्कार असा झाला कीं, त्या वेळेपासून त्याच्या घरांतलें दुखणेंबाणें अगदीं नाहींसें होऊन त्याच्या कुटुंबांतील सर्व माणसें सुखानें कालक्रमण करूं लागलीं !

## व्यायामाची आवश्यकता.

एका डॉक्टरपाशीं मंदाग्नीवर हटकून गुण आणणारें औषध असल्याबद्दल प्रसिद्धि होती. पण वास्तविक पाहतां तो आपल्या-कडे येणाऱ्या रोग्यांना खाण्यापिण्याचा नेमस्तपणा ठेवण्यास व व्यायाम करण्यास लावी, हेंच मुख्यतः त्याच्या प्रसिद्धीचें कारण होतें. एकेवेळीं सुमारें पस्तीस चाळीस वर्षांचा पोट सुटलेला एक मनुष्य त्याजकडे आला व आपल्याला भूक मुळींच लागत नाहीं यावर कांहीं औषध द्या, असें त्यास म्हणाला. डाक्टरानें त्याची पूस-तपास करतां त्यास असें आढळून आलें कीं, हे राजश्री पैसेवाले असल्यामुळें यांचा सर्व कारभार गाडींत बसून चालतो, व यांना वाटेल तो जिन्नस मिळण्यास अडचण नसल्याकारणानें हे खातात मात्र पुष्कळ, पण तें पचविण्याचा कांहींच उपाय करीत नाहींत. मग डॉक्टरानें त्या गृहस्थास, मजबरोबर गाडींत बसून शहराबाहेर

जरा फिरावयास येतां काय, असें विचारलें. त्यानें होय म्हणून म्हटलें, व तो आणि डॉक्टर असे गाडींत बसून सुमारें पांच मैलपर्यंत उघड्या मैदानांत गेले. नंतर डॉक्टरानें मुद्दामच आपल्या हातांतला चाबूक खालीं टाकला, आणि आपल्या रोग्यास खालीं उतरून तो घेऊन येण्याविषयीं विनंती केली. पण तो गृहस्थ खालीं उतरून त्यानें डॉक्टरच्या हातांत चाबूक दिल्याबरोबर, डॉक्टरनें त्याला गाडींत न येऊं देतां तशीच ती भरादिशी हांकली व आपण चालता झाला. तेथून निघतांना त्यानें रोग्यास हंसून म्हटलें, 'आतां तुह्मी येथून पायीं घरापर्यंत आलां म्हणजे तुह्मांला चांगली भूक लागल बरें !' आणि खरोखरच त्याप्रमाणें झालें ! मग तो गृहस्थ दररोज सडकून तीनचार तास व्यायाम करूं लागला, व त्याची भुकेची तक्रार म्हणून अगदीं राहिली नाहीं !

वरच्यासारख्याच एका मेद वाढलेल्या मनुष्यानें दुसऱ्या एका डॉक्टरापाशीं भुकेकरितां औषध मागितलें. हा डॉक्टर मोठा हुशार पण जरासा विनोदी होता. त्यानें आपल्या रोग्यास म्हटलें, 'अहो महाराज ! तुम्हांला औषधाची मुळींच गरज नाहीं. तुम्ही दररोज चार आण्यांच्या पदार्थांवर उपजीविका करीत जा, व ते चार आणे स्वतः मेहनत करून मिळवीत जा म्हणजे झालें !'

## रोगाची उपेक्षा केल्यापासून भयंकर परिणाम.

मुंबईस कोणी एक श्रीमान् व्यापारी मरण पावल्यामुळें त्याच्या अगदीं तरुण—ऐन पंचवीशींतल्या वयाच्या—मुलावर व्यापाराचें सर्व काम पडलें. हा मुलगा मोठा हुशार व होतकरू होता. त्याला आषाढ महिन्यांत एके दिवशीं ताप आला असतां त्याच दिवशीं कांहीं कामाकरितां माहिमास जाण्याचें कारण पडलें. पण त्या दिवशीं तो गेला नसता, व त्यानें थोडें औषध घेतलें असतें,

म्हणजे सर्व ठीक झालें असतें. तथापि काम अतिशय जरूरीचें असल्यामुळें व हा गृहस्थ तारुण्याच्या भरांत असल्यामुळें, गेलें म्हणून काय होणार आहे असें त्यांस वाटून तो माहिमास चालता झाला. तो परत आल्यावर अर्थातच रात्रीं त्याला जास्त ताप आला तरी पण तो मोठा करारी स्वभावाचा असल्यामुळें त्यानें तिकडे लक्ष दिलें नाहीं, व रात्रीं कामकाजाचीं पत्रें लिहीत बराच वेळ जागत बसला. पुढें कांहीं दिवस त्याचा असाच क्रम चालला व मधूनमधून तो कामकाज असलें म्हणजे बाहेरही जात असे. असें होतां होतां त्याचा ताप जास्त वाढून त्याला खोकलाही झाला, आणि तशांतच एके दिवशीं समुद्रावर त्याचा कांहीं भारी किंमतीचा माल आलेला होता तो आणण्याकरितां तो गेला. त्या दिवसापासून त्याची प्रकृति फारच बिघडली. तथापि त्यानें आपला नित्यक्रम मुळींच सोडला नाहीं शेवटीं एके दिवशीं त्याच्या वखारींत कोणी डॉक्टर कांहीं काम करितां आला होता, त्यानें त्याची स्थिति पाहून त्यास म्हटलें, 'शेटजी, तुम्ही अशा स्थितींत वाऱ्यावर फिरतां हें अगदीं बरोबर नाहीं. या योगानें तुम्ही आपल्या जिवाला धोका आणाल. तुह्मी आतांच्या आतां घरीं जा, आणि कांहीं दिवस खोली न सोडतां औषधपाणी काळजीपूर्वक घ्या, नाहीं तर तुमची गत मला नीट दिसत नाहीं ! '

त्या तरुण व्यापाऱ्यानें मोठ्या नाखुषीनें डॉक्टराच्या म्हणण्याप्रमाणें केलें. पण 'बैल गेला आणि झोपा केला' अशासारखाच तो प्रकार झाला ! त्यानें पुष्कळ नामांकित वैद्य, डॉक्टर वगैरेचीं औषधें घेतलीं, पण कांहींएक उपयोग झाला नाहीं. त्याच्या फुफ्फुसाला भयंकर विकार झाला व तोच असाध्य होऊन तो सुमारे एका महिन्यानें मरण पावला ! येणेंकरून त्याच्या कुटुंबाची केवढी बरें हानि झाली ! एके ठिकाणीं म्हटलें आहे—

विषवल्ली जों वाढ नेघे । तों खडूनि टाकावी वेगें ॥
त्याप्रमाणें रोग सुईएवढा आहे तोंच त्याला घालविण्याविषयीं उपाय केला तर बरें, नाहींपेक्षां तो लवकरच कुऱ्हाडीएवढा होऊन प्राणघात केल्यावांचून कदापि राहणार नाहीं !

आरोग्याचा महिमा किती म्हणून सांगावा ! कोणी थोर ग्रंथकार म्हणतो. ‘ हे आरोग्यदेवते ! जगांतील सर्व संपत्तीपेक्षांही तुझें मोल अधिक आहे ! बाई, तुझ्या योगानें मनुष्याचें मन सुशिक्षित होतें, तो विद्यासंपन्न होऊन कीर्ति व ऐश्वर्य मिळवितो, व वृद्धापकाळीं अमोलिक सौख्य प्राप्त करून घेतो. एकंदरीनें ज्यावर तुझी कृपा झाली त्याला जगांत कांहींच उणें नाहीं,' पण ज्यावर तुझी अवकृपा झाली त्याला हें जग असून नसून सारखेंच आहे. एवढा तुझा महिमा असून तुझें सौजन्य तरी केवढें कीं, तुझी कृपा किंवा अवकृपा संपादन करणें हें तूं ज्याचें त्याच्यावरच ठेविलें आहेस.

---

## मुलास आईचें सांगणें.

### आर्या.

बाळा ! उजाडलें उठ तूर्ण शुचिर्भूत हो करीं स्मरण
परमेशाचें ज्याला भजतां चुकतात जनन हीं मरण. १
जा लोकांत कर तुला येइल उद्योग जो करायास
मात्र न पाप घडो तुज—कडून ऐसा धरीं मनीं ध्यास. २
द्रव्यावांचुन नाहीं चालत निर्वाह या धरेवरती
यास्तव तें मिळवाया श्रम सगळे राव रंक कीं करिती. ३
धनपेटिकों उघडण्या उद्योगासम दुजी नसे किल्ली

---

१ लवकर. २ स्वच्छ [ झालेला ]. ३ पृथ्वीवर. ४ द्रव्याची पेटी.

ती घेतलिया हातीं मग नलगे धुंडणें पुणें दिल्ली ! ४
तनमन शिणवुनि करणें काम खरें बोलणें विनम्रपणें
साधुपथा अनुसरणें असाधुंपथवर्जनीं सदा जपणें. ५
श्रेष्ठास मान देणें बरोबरीच्यास बंधुसें गणणें
दीनांस यथाशक्ती साह्य करायास निशिदिनीं झटणें. ६
सर्वांशीं सदयपणें वर्तुन परहित सुपुण्य तें करणें
देवभया मनिं धरणें संतांच्या मंडळांत संचरणें ७
आत्मस्तुति परनिंदा न गेलिया प्राणही कधीं करणें
मृदु मधु बोलूनि मनें सर्व जनांचीं परोपरी धरणें. ८
क्षणभंगुर हें ऐहिकें सगळें समजुनि अलिप्त मन धरणें
अंतःकरणकमल हें भक्तिरसीं गढुनि नित्य तॅरतरणें. ९
केलें कांहीं अंतीं तरि मज लागेल खचित कीं मरणें
ह्याचें स्मरण असावें संतत मग सुलभ भवनदी तरणें. १०
यांताचि आहे सगळें सुख ऐसें थोर थोर गातात
याचा प्रत्यय ऐसें वर्तुनियां शाहणे पाहतात. ११
हें मज साधुमुखानें कळलें तें तुज निवेदिलें बापा
हें कारण हो तुझिया सुखवृद्धीला हरोनियां तापा. १२
हे थोर नीतिनौका बसले जे हींत ते सकल तरले
ते साधु थोर सज्जन देव असें सर्वतोमुखीं ठरलें ! १३
त्या नावेंत बसावें या भवसागर तरोनियां जावें
इहपरसुख लाधावें तुज तूझें हें यश कवीश्वरीं गावें ! १४

---

१ वाईट मार्ग सोडण्यांत. २ येथलें. ३ [ त्यांच्या लोभापासून ] मोकळें. प्रफुल्लित होणें. ५ संसाररूपी नदी.

# उद्योग आणि मितव्यय.

जगत्कर्त्यानें मनुष्याच्या पोषणासाठीं व सुखासाठीं पृथ्वीवर अनेक वस्तु उत्पन्न होण्याची योजना केली आहे. पण त्या बहुतेक त्याला आयत्याच प्राप्त होतात असें नाहीं. त्यांजकरितां त्याला श्रम केले पाहिजेत. उदाहरणार्थ धान्य घ्या. तें पेरावें लागतें, व पुढें तें कापून मळून घरीं आणीतोंपर्यंत त्याजवर पुष्कळ मेहनत करावी लागते, धातु खाणींतून खणून काढावे लागतात, व नंतर त्यावरही पुष्कळ मेहनत करावी लागते, तेव्हां त्यांचीं भांडीं वगैरे तयार होतात. ताग, लोकर, कापूस इत्यादिकांचेंही असेंच आहे—म्हणजे त्यांचीं वस्त्रें होत तोंपर्यंत पुष्कळ प्रकारची खटपट मध्यंतरीं करावी लागते. असेंच बाकीच्या बहुतेक सर्व पदार्थांचें आहे. या अशा प्रकारच्या श्रमाच्या योगानेंच व्यक्तीची अथवा राष्ट्राची संपत्ति उत्पन्न होते.

या नियमानुसार म्हटलें म्हणजे प्रत्येक मनुष्यानें आपणाला अन्नवस्त्र किंवा दुसरें जें काय लागेल त्याबद्दल आपला मेहनतीचा वांटा उचलला पाहिजे हें रास्त आहे. जे लोक उद्योगी असतात त्यांची स्थिति सर्व प्रकारें फार चांगली असते; ते आपल्या गुरांढोरांची चांगली निगा ठेवितात, यामुळें दुभत्याचा वगैरे त्यांस चांगला पुरवठा होतो; तसेंच ते शेतांत मेहनतमशागत करून त्यांतून चांगलें उत्पन्न काढितात; खुष्कीनें व जलमार्गानें दुसऱ्या देशाशीं व्यापार करून आपले जिन्नस किफायतीनें विकतात व दुसरीकडचे आपल्या देशांत आणून त्यांवरही नफा मिळवितात. आतां ह्याच्या उलट निरुद्योगी, रानटी वगैरे लोकांची स्थिति पहा. आफ्रिकेंतील सर्व रानटी लोक, आस्ट्रेलिया वगैरे बेटांतील मूळचे राहणारे लोक, यांना उद्योग कसा तो मुळींच माहीत नाहीं. ते

केवळ कंदमुळें व शिकार यांवर आपली उपजीविका करितात. वस्त्र-प्रावरणें तर बहुतकरून त्यांना मुळींच माहीत नाहींत. पावसाळ्यांत अगर कडक हिंवाळ्यांत त्यांस खावयास मिळण्याची पुष्कळ वेळां पंचाईत पडते. तेव्हां अर्थातच त्यांपैकीं पुष्कळांना उपाशीं मरावें लागतें! सारांश सुधारलेल्या उद्योगी लोकांच्या आणि वर सांगितलेल्या लोकांच्या स्थितींत जमीनअस्मानाचें अंतर आहे! वरील रानटी लोकांच्या देशांत प्रत्येक चौरस मैलास एका मनुष्याचेंही पोट भरण्याची मारामार पडते. तीच सुधारलेल्या देशांतील लोकांची स्थिति पाहिली असतां असें दिसून येतें कीं, तेथें प्रत्येक चौरस मैल जमिनीवर शंभरापासून तीनशें लोकांचा निर्वाह चांगला होतो!

ही वर जी राष्ट्रांची गोष्ट सांगितली, तीच व्यक्तिमात्रालाही लागू आहे. जो कोणी उद्योग करीत नाहीं त्याच्या घरीं दारिद्र्य ठेवलेलें. पण जो उद्योग करितो, त्याला बहुधा कशाचीही वाण नसते. ईश्वरानें, बहुतेक सर्व वस्तु उद्योगानेंच मिळाव्या अशी योजना केली असून तो उद्योगही पण मनुष्याला सुखावह व्हावा, असें केलें आहे. आपल्याला कांहीं तरी शारीरिक व मानसिक श्रम असल्यावाचून आपल्याठायीं आरोग्य राहणार नाहीं, व आपल्याला चैन पडणार नाहीं. जे गर्भश्रीमंत असतात त्यांना निर्वाहाकरितां श्रम करण्याचें कारण नाहीं हें खरें, पण त्यांनीं कांहींच न करितां स्वस्थ खाऊन तक्यालोडांशीं गांठ ठेविली तर त्यांना कदापि सुख होणार नाहीं. त्यांना खायला असून त्याचा कांहींएक उपयोग व्हावयाचा नाहीं; कां कीं, खाल्लेलें अन्न पचायापुरते तरी श्रम झाले पाहिजेत कीं नकोत? ते त्यांजकडून न झाले तर त्यांच्या शरिरांत मेद वाढतो व तें इतकें जड होतें कीं, त्यांचें त्यांना तें तोलण्यालाही कठिण पडतें. अशीं शेंकडों उदाहरणें आपल्या दृष्टीस पडतात.

उद्योगशीलतेच्या योगानें मनुष्य स्वावलंबी होतो, म्हणजे होतां

होईल तोंपर्यंत त्यास दुसऱ्यावर अवलंबून रहावें लागत नाहीं; व दुसऱ्यावर अवलंबून न राहतां स्वतःच्या श्रमानेंच जो उदयास येतो, त्याची थोरवी इतरांपेक्षां लोक जास्त मानितात.

पण उद्योग करावयाचा तोंही विचारानें व जसा मानवेल तसा बेताबातानें केला पाहिजे. आपल्या शक्तीच्या बाहेर जर आपण मेहनत केली, तर लवकरच शरिरास इजा जडून तिकडूनही वाईट परिणाम होईल. साधारणपणें शरिरास किंवा मनास त्रास न होतां आरोग्य राहण्यास म्हटलें म्हणजे दररोज आठपासून दहा तासपर्यंत उद्योग मनुष्यानें करीत जावा असें अनुभवी लोकांचें म्हणणें आहे.

परंतु आपण हवा तितका उद्योग करूनही जर खर्चाचें मान बेताचें ठेविलें नाहीं, तर त्या उद्योगाचा फारसा उपयोग होणार नाहीं. त्यांतूनही आपला खर्च आद्यापेक्षां जास्त असल्यास मग त्या फजितीला तर पारावारच नाहीं ! अशा अव्यवस्थेनें कर्जाचा बोजा आपल्या डोक्यावर बसून शेवटीं आपले हाल कुत्रा खाणार नाहीं ! याकरितां खर्च नेहमीं बेताचा राहील अशी आपण तजवीज ठेविली पाहिजे, व जें मिळेल त्यांतून कांहीं शिलक टाकण्याचा यत्न केला पाहिजे; कां कीं, मनुष्याच्यानें सारा जन्मभर एकसारखा उद्योग होणें अशक्य आहे; तेव्हां अडचणीच्या प्रसंगाकरितां कांहीं तरी तजवीज केलेली असणें अवश्य आहे. हें नच होईल तर निदान उत्पन्नापेक्षां खर्च ज्यास्त न होईल येवढ्याविषयीं तरी सर्वांनीं जपावें.

---

## क्रेसिन याची गोष्ट.

सांप्रत बहुतेक युरोपखंड हें उद्योगाचें व सुधारणेचें माहेरघर झालें आहे; परंतु पूर्वीं तेथले पुष्कळ लोक आळशी व अडाणी असून त्यांच्यांत अनेक प्रकारच्या वेड्या वेड्या समजुती होत्या. इताली देशां-

तील एका प्रांताची या प्रकारची स्थिति असतां तेथें क्रेसिन या नांवाचा कोणी मोठा उद्योगी पुरुष निपजला. त्यानें आपल्या उद्योगाच्या योगानें आपलें शेतभात इतक्या उत्तम स्थितीस आणिलें कीं, इतरांस त्याचें पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें; व त्या बिचाऱ्यांना हें कोडें सोडविण्याची किल्ली ' उद्योग ' होय हें मुळींच माहीत नसल्यामुळें, क्रेसिन हा जादूच्या योगानें आपल्या शेतांत जास्ती पीक आणतो असा त्यांनीं त्याजवर न्यायाधिशापुढें आरोप आणिला.

न्यायाधिशानें फिर्याद ऐकून घेऊन, क्रेसिन यास याबद्दल तुझें काय म्हणणें आहे असें विचारिलें. तेव्हां, त्यानें आपली एक धडधाकट मुलगी, आपलीं शेतकीचीं आउतें व बैल वगैरे कोर्टापुढें आणून उभे केले, आणि म्हणाला, मी आपलें शेत नांगरून व त्यांत खत घालून त्याची चांगली मशागत करितों, व ही माझी मुलगी माझें शेत बेणते आणि त्यास पाणी वगैरे लावून त्याची चांगली व्यवस्था राखते. तशींच हीं माझीं आउतें पहा. ह्यांपैकीं एकही मोडकेंतोडकें नसून हीं सगळीं चांगलीं कामाजोगतीं आहेत. त्याचप्रमाणें हे माझे बैल पहा.' त्यांची मी चांगली जोगवण ठेवतों यामुळें ते चांगले धष्टपुष्ट व बळकट झाले असून या देशांत त्यांची बरोबरी करणारे दुसरे बैल कोठेंही सांपडावयाचे नाहींत. माझ्या शेतांत पीक पुष्कळ येण्याला मी जादूचा उपयोग करतों असा जो मजवर आळ घातला आहे ती सर्व जादू यांत आहे ! मजवर फिर्याद आणणाऱ्यांनीं पाहिजे तर तिचा उपयोग करून घ्यावा, म्हणजे त्यांनाही मी म्हणतों हें खरें आहे असें दिसून येईल ! '

हा त्या उद्योगी शेतकऱ्याचा वाका ऐकून न्यायाधीश म्हणाला, ' आजपर्यंत पुष्कळ आरोपी मजपुढें आले, पण आपल्यावरील दोषारोपाच्या निवारणार्थ इतका सबळ पुरावा कोणींही आणिलेला मीं

ऐकिला नाहीं!' असें म्हणून त्यानें क्रेसिन ह्याच्या उद्योगाबद्दल त्याची पुष्कळ तारीफ करून त्यास निरोप दिला.

---

## सर रॉबर्ट इन्नेस याची गोष्ट.

सर रॉबर्ट इन्नेस या नांवाचा स्कॉटलंड देशांत एक सरदार होऊन गेला. तो केवळ अल्पवयी म्हणजे एकोणीस वर्षांचा असतां त्याजवर संकटाचा प्रसंग येऊन तो मोठ्या विपत्तींत पडला. अशा स्थितींत पुष्कळ लोकांनीं आपल्या इष्टमित्रांवर अथवा सरकारावर भार घालून त्यांच्या आश्रयावर कालक्रमणा केली असती. परंतु ह्या थोर गृहस्थानें आपल्या स्वतःच्या श्रमांवर आपला निर्वाह करण्याचा निश्चय केला. त्याला उद्योगधंद्याचें वगैरे कांहींएक काम येत नव्हतें. यास्तव आपण शिपाईगिरी पतकरावी हें बरें असें त्यास वाटून त्यानें एका पलटणींत आपलें नांव घातलें.

एके दिवशीं तो छावणीवर पहारा करीत असतां, ज्या एका गृहस्थास त्याची माहिती होती तो सहज कांहीं कामाकरितां त्या पलटणीच्या कर्नलाकडे आला. कर्नल त्या वेळीं दुसऱ्या कोणापाशीं बोलत बसला असल्यामुळें वरील गृहस्थ हा त्या पहारा करणाऱ्याशीं बोलत उभा राहिला. तेव्हां त्यास आढळून आलें कीं, हा पहारेकरी म्हणजे कोणी सामान्य मनुष्य नव्हे, तर सर रॉबर्ट इन्नेस हा आहे.

पुढें तो गृहस्थ कर्नलास भेटल्यावर त्यास त्यानें म्हटलें, 'महाराज, तुमच्या येथें एवढ्या मोठ्या पदवीचा गृहस्थ ज्या अर्थी पहारेकरी आहे, त्या अर्थीं आज कित्येक राजांपेक्षांही तुमचें भाग्य मोठें आहे असें समजलें पाहिजे!' हें ऐकून कर्नलास मोठा विस्मय वाटला, व लागलीच त्यानें सर रॉबर्ट ह्याच्या कामावर दुसरा पहारेकरी पाठवून, त्याला आपल्याकडे बोलाविलें. तो आल्यावर कर्नल

त्यास म्हणाला, 'अहो, तुह्मीच सर रॉबर्ट इन्नेस कीं काय ! व असें असेल तर ही असली हलकी जागा तुम्हीं काय म्हणून पतकरली ?' सर रॉबर्ट ह्यानें उत्तर केलें, 'होय, आपण म्हणतां तोच मी आहें. माझ्यापाशीं एक पैही न राहिल्यामुळें मीं मनांत असा विचार केला कीं, दुसऱ्याचें मेलेलें अन्न खाण्यापेक्षां आपली पदवी वगैरे दोन दिवस विसरून जाऊन स्वतःच्या श्रमावर निर्वाह करावा हें फार चांगलें व त्याकरितां मीं हें काम पत्करलें आहे.'

हें त्याचें बोलणें ऐकून कर्नल फार खूष झाला, व अशी धैर्याची वर्तणूक करणारा मनुष्य म्हणजे सामान्य नव्हे, अशी त्याजविषयीं त्याची खातरी होऊन त्यानें त्यास त्या दिवशीं मुद्दाम सुटी दिली, व आपल्या पंक्तीस भोजनास बोलाविलें. खेरीज तो त्यास आपल्या पोषाखांपैकीं एक पोषाखही देऊं लागला, परंतु सर रॉबर्ट यानें सांगितलें कीं, 'तूर्त मला कांहीं पोषाखाची गरज नाहीं; कारण मीं शिपायाचें काम पतकरलें नव्हतें त्या वेळचे माझे कांहीं कपडे अद्यापि शिल्लक आहेत.' असो; याप्रमाणें सर रॉबर्ट याच्या सरळ व थोरपणाच्या वर्तणुकीमुळें कर्नलाची त्याजवर इतकी मर्जी बसली कीं, त्यानें लवकरच त्याजकरितां खटपट करून एक मोठी सन्मानाची जागा त्यास देवविली. पुढें कर्नलाची मुलगी ज्या शाळेंत शिकत होती तेथें तो सर रॉबर्ट ह्यास घेऊन गेला असतां ती मुलगी व सर रॉबर्ट ह्या उभयतांची एकमेकांवर प्रीति बसली, व थोडक्याच दिवसांत त्यांचा विवाह झाला. नंतर सर रॉबर्ट याच्या गुणांवरून त्यास लवकरच त्याची पूर्वींची स्थिति प्राप्त झाली, व त्या उभयतां स्त्रीपुरुषांचा संसार उत्तम झाला.

---

## ' आजचें काम उद्यांवर टाकूं नका ! '

फ्रान्स देशांत ब्रिटनी म्हणून एक प्रांत आहे. त्याची प्राचीन राजधानी रेनीस शहर हें कायदेकानू व वकील यांविषयीं मोठें प्रख्यांत आहे. त्या देशांतील निरनिराळ्या ठिकाणचे लोक अनेक प्रकारची माहिती मिळविण्याकरितां व सल्लामसलत विचारण्याकरितां या शहरीं येतात. ब्रिटनी प्रांतांतील एखादा मनुष्य या शहरीं गेला व त्यानें येथील वकिलाची सल्लामसलत घेतली नाहीं असें कधींच घडलें नाहीं. ही चाल विशेषेंकरून गरीब शेतकरी लोकांत आज शेंकडों वर्षांपासून सारखी चालत आली आहे.

एकदां असें झालें कीं, बर्नार्ड या नांवाचा एक शेतकरी कांहीं कामाकरितां रेनीस शहरीं आला होता. त्यानें असा विचार केला कीं, आपल्याला येथें थोडा वेळ रहावयाचें आहे, तर तेवढ्या अवकाशांत एकाद्या चांगल्या वकिलाची सल्लामसलत आपण घ्यावी. फॉय नामक वकिलाचें नांव त्यानें पुष्कळदां ऐकिलें होतें, व त्याची अशी ख्याति होती कीं, त्यानें एकदां मुकदमा हातीं धरिला कीं, त्यांत त्याला जय मिळावयाचाच. हा वकील कोठें राहतो वगैरे माहिती विचारून घेऊन शेतकरी त्याच्या घरीं गेला. त्याच्या घरीं कुळांची फारच गर्दी असल्यामुळें शेतकऱ्याला कांहीं वेळ वाट पहात बसावें लागलें. शेवटीं त्याची पाळी येऊन वकिलानें त्यास बोलविलें, व त्यांचें पुढें लिहिल्याप्रमाणें भाषण झालें:—

शेतकरी—वकीलसाहेब, आपला नांवलौकिक मीं पुष्कळ ऐकिला आहे. तेव्हां आज येथें माझें येणें झाल्यावरून, आपला सल्ला घेण्याची संधि साधावी असें माझ्या मनांत आलें आहे.

वकील—माझ्याविषयीं आपल्या मनांत पूज्यबुद्धि आहे याबद्दल

मी आपला फार आभारी आहें. आपणाला कोणावर फिर्याद करावयाची असेल. नाहीं बरें ?

शेतकरी—फिर्याद ! त्या गोष्टीचा तर मला फार तिटकारा आहे. नुसता रागाचा शब्दही मी कोणाशीं कधीं बोललों असें मला आठवत नाहीं.

वकील—तर मग मालमत्तेच्या वांटणीबद्दल कांहीं भानगड आहे कीं काय ?

शेतकरी—माझ्या व माझ्या कुटुंबांतील इतर मंडळींच्या मनांत वांटणीचा विचार कधींच आला नाहीं. आपण सर्व एकाच ईश्वराचीं लेंकरें असल्यामुळें आम्हां सर्वांचें तोच पोषण करितो. तेव्हां वांटणीच्या संबंधानें कांहीं तक्रार असण्याचें कारण नाहीं.

वकील—तर मग खरेदी अगर विक्रीसंबंधानें कांहीं काम असेल वाटतें !

शेतकरी—छे ! चैनीकरितां नानाप्रकारचे पदार्थ विकत घेण्याइतका मी श्रीमान् नाहीं, व उपजीवनार्थ घरचा माल नेऊन विकण्याइतका मी कंगालही नाहीं !

वकील—( मोठ्या आश्चर्यानें ) तर मग माझ्यापासून आपल्यास पाहिजे तरी काय ?

शेतकरी—वकीलसाहेब, मीं आपल्याला पूर्वींच सांगितलें आहे कीं, मला आपल्यापासून कांहीं चांगला सल्ला पाहिजे. त्या संबंधानें आपली फी असेल तीही सांगा. ती देण्यास मी तयार आहें; कारण अशी संधि मी दवडूं इच्छीत नाहीं.

वकिलानें कागद आणि लेखणी घेऊन त्या शेतकऱ्यास त्याचें नांव विचारलें. तेव्हां शेवटीं आपला मतलब वकिलास समजला म्हणून हर्ष पावून शेतकऱ्यानें उत्तर दिलें, 'माझें नांव पीटर बर्नार्ड.'

वकील—तुमचें वय ?

**शेतकरी**—तीस वर्षांचें किंवा त्याच्या जवळ जवळ.

**वकील**—आपला उद्योग ?

**शेतकरी**—माझा उद्योग ! म्हणजे माझा धंदा म्हणतां होय ? मी शेतकरी आहें.

वकिलानें दोन ओळी लिहिल्या, कागदाची घडी केली, आणि तो त्याच्या हातीं दिला.

**शेतकरी**—लिहून झालें आपलें? बरें, या सल्ल्याची किंमत काय ?

**वकील**—दोन रुपये.

बर्नार्ड यानें पैसे दिले व वकिलाचा निरोप घेतला, आणि आपणांस प्राप्त झालेल्या संधीचा आपण चांगला फायदा करून घेतला असें त्याच्या मनांत येऊन तो फार खुष झाला. तो जेव्हां आपल्या घरीं पोहोंचला तेव्हां चार वाजले होते. वाटेच्या श्रमानें तो फार थकला होता म्हणून त्या दिवशीं विश्रांति घ्यावयाची असा त्यानें निश्चय केला.

शेतकरी घरीं नसतां गड्यांनीं जें गवत कापून ठेविलें होतें, तें चांगलें वाळलें होतें, म्हणून तें आंत आणून ठेवावयाचें किंवा कसें हें त्यांस विचारण्याकरितां एक गडी आला. त्या गड्याचें हें बोलणें ऐकून शेतकऱ्याची बायको म्हणाली, ‘ काय ? गवत आंत ठेवावयाचें ? पण आतां संध्याकाळ झाली आहे त्या अर्थीं हें काम उद्यां केलें असतां बरें होईल. ’ गडी म्हणाला, ‘ उद्यां कदाचित् पाऊस येईल. आतां उघाडी आहे, व मनुष्यांनाही कांहीं काम नाहीं. ’ शेतकऱ्याची बायको म्हणाली, ‘ पावसाचीं कांहीं चिन्हें दिसत नाहींत, व हें काम संपावयाचे आंत काळोखही पडेल. तेव्हां आज तें राहूं द्यावें परतें असें मला वाटतें. ’

बर्नार्ड हें सर्व भाषण ऐकत होता व या संबंधानें काय करावें याचा निश्चय अद्यापि त्यानें केला नव्हता. इतक्यांत वकिलाचा सल्ला

आपल्या खिशांत आहे ही त्यास आठवण झाली. मग तो म्हणाला, ' जरा थांबा, एका शहाण्या मनुष्यानें मला सल्ला दिला आहे, व त्याकरितां मीं दोन रुपये खर्च केले आहेत. तर त्यावरून आपण आतां काय करावें हें आपल्यास चांगलें समजेल. ' नंतर खिशांतून कागद काढून बायकोस म्हणतो, ' पहा यांत लिहिलें आहे तें. माझ्यापेक्षां तुला चांगलें वाचतां येईल.

त्याच्या बायकोनें तो कागद घेतला, आणि पुढील शब्द वाचलेः—' **आजचें काम उद्यांवर टाकूं नका.** ' बर्नार्ड मोठ्या हर्षानें म्हणाला, ' चला तर मग आतां. मुलांमुलींनो, गडीमाणसांनो, सर्वजण कुरणांत चला. ' त्याच्या बायकोनें आणखी थोडी हरकत केली, परंतु त्यानें एकच उत्तर दिलें कीं, ' दोन रुपये खर्च करून मीं जो सल्ला मिळविला आहे, तो कांहीं केरांत टाकण्याकरितां नाहीं, मी तर या सल्ल्याप्रमाणें करणार ! ' असें म्हणून आपण सर्वांचे पुढें झाला, आणि सर्व गवत घरांत येईतोंपर्यंत तेथून हालला नाहीं.

नंतर रात्रींच्या वेळीं आकाश ढगांनीं भरून मोठया जोराचा पाऊस पडला, व दुसरे दिवशीं सकाळीं पहातात तों नदीनाल्यांस मोठा पूर येऊन, ज्यांचें गवत बाहेर राहिलें होतें, तें सर्व वाहून गेल्यामुळें त्यांचें फार नुकसान झालें. बर्नार्ड याचें मात्र अर्थातच कांहीं नुकसान झालें नाहीं. तेव्हां वकिलाच्या त्या सल्ल्याबद्दल त्याला फार संतोष झाला. पुढें दरवर्षीं तो शेतकरी त्या वकिलाच्या भेटीस जात असे, व कांहीं उत्तम उत्तम पदार्थ बरोबर नेऊन ते त्यास नजर करीत असे. *

---

* ही गोष्ट ' **वृत्तधारा** ' पत्रावरून फेरफार करून घेतली आहे.

## बेंजामिन फ्रांकलिन.

बेंजामिन फ्रांकलिन याच्यासारखें उद्योगी व मितव्ययी मनुष्याचें उदाहरण क्वचितच आढळेल. तो केवळ आपल्या उद्योगाच्या व मितव्ययीपणाच्याच योगानें यःकश्चित् खिळे जुळण्याच्या धंद्यापासून चढत चढत मोठा विद्वान् व धनाढ्य व्यापारी झाला; एवढेंच नव्हे, तर मोठमोठ्या राजकारणी लोकांच्या मांडीशीं मांडी लावून बसण्याची योग्यता पावला. त्याचें चरित्र प्रसिद्ध झालें आहे त्यांतील, किंवा निदान मेजर क्यांडीकृत मराठी पांचव्या पुस्तकांत त्याची जी संक्षिप्त हकीकत दिली आहे तींतील मुद्दे नेहमीं ध्यानांत ठेवून त्याप्रमाणें वागलें असतां, प्रत्येक मनुष्यास आपल्या स्थितींत हवी तितकी सुधारणा करतां येईल. त्याचे जे कित्येक लेख आहेत, त्यांचीं शेंकडों पारायणें करावीं इतकी त्यांची योग्यता आहे !

फ्रांकलिन म्हणतो, ' तुम्हांला जर संपत्तीची इच्छा असेल, तर ती प्राप्त होण्याचे दोन मोठे राजमार्ग आहेत. त्या मार्गांनीं गेलें म्हणजे ती आपोआप आपल्या पायांपाशीं येऊन लोळते ! ते दोन मार्ग म्हणजे ' उद्योग ' आणि 'मितव्यय.' या दोहोंची कास धरली म्हणजे कोणत्याही गोष्टीची उणीव पडणार नाहीं. पण त्यांच्यावांचून म्हटलें तर कांहींच प्राप्त होण्याची आशा नको ! ' आणखी तो म्हणतो, ' आज चालली आहे ही वेळ साधून घ्या, ही फुकट दवडूं नका; कां कीं, उद्यां तुमच्या उद्योगांत किती अडचणी येतील याचा नेम नाहीं ! जो कोणाचा नोकर आहे, त्यास गमतांना धन्यानें पाहिलें असतां त्याला ती केवढी शरमेची गोष्ट आहे ! त्याचप्रमाणें, जो कोणाचा नोकर नाहीं, त्यानें आपण स्वतःचे नोकर आहों असें समजून स्वतःला गमतांना पाहून ओशाळायाला नको काय ? एकाद्या देशाच्या सरकारानें जर असा कायदा केला कीं सर्व प्रजेनें आपल्या वेळापैकीं एक दशांश वेळ आपल्या नोकरींत घालवावा, तर ती गोष्ट

त्या लोकांस अन्यायाची वाटेल. पण आळसामध्यें लोकांचा किती वेळ जातो याचा विचार केला असतां वरील कायदा मोठासा जुलमाचा होईल असें म्हणतां येणार नाहीं ! आळस हा रोगाचें मूळ आहे, व त्याचे योगानें मनुष्याचें आयुष्य कमी होतें यांत संशय नाहीं. जसें लोखंड हें वापरल्यापेक्षां जंगानें जास्त झिजतें, त्याचप्रमाणें श्रमापेक्षां आळसानें शरीर जास्त झिजतें. वेळ हा अत्यंत अमोलिक आहे, ही गोष्ट सर्वांस कबूल आहे. असें जर आहे, तर तो व्यर्थ खर्च करणें ह्यासारखा दुसरा उधळेपणा कोणता ? इतर वस्तूंची गोष्ट एक वेळ असो; पण वेळेचें असें आहे कीं, ती हातची एकदां गेली म्हणजे गेली ! आळशाला सर्व गोष्टी अवघड आहेत, पण उद्योगी मनुष्याला त्या अगदीं सोप्या आहेत. आळशाचें पाऊल इतकें सावकाश पडत असतें कीं, दारिद्र्य त्याला झटकन् गांठतें ! '

आणखी तो म्हणतो, ' श्रमावांचून कोणाला कांहींच मिळावयाचें नाहीं. ज्याचा व्यापार आहे त्याला ती मालमत्ताच आहे, व ज्याला रोजगार आहे त्याला मिळकत आणि सन्मान आहे. पण मेहनत केल्यावांचून व्यापार किंवा रोजगार चालावयाचा नाहीं; व मग आपली मालमत्ता, मिळकत आणि सन्मान हीं मुळींच जाग्यावर राहणार नाहींत ! ' कोणी म्हणेल कीं, मी अशक्त आहें, माझ्यानें पुष्कळ काम कसें होईल ? मी त्यास असें उत्तर करतों, बाबा ! धिमेपणानें कामाच्या मागें लाग, म्हणजे त्याचे ढीग पडलेले तुझ्या दृष्टीस पडतील ! मनुष्यानें अगदीं विश्रांति घेऊं नये कीं काय असें कोणी मला विचारील, तर त्यास माझें असें उत्तर आहे कीं, बाबा ! आपल्या वेळेचा चांगला उपयोग कर, म्हणजे विश्रांति आपोआप मिळेल ! '

---

## कित्येक थोर मितव्ययी लोक.

ज्यांच्यापाशीं पैशाला बिलकूल वाण नव्हती, व ज्यांनीं लाखों रुपये खर्च केले असते तरी ज्यांना कोणी मनाई करणारें नव्हतें, असे कित्येक मोठमोठे थोर लोकही फार काटकसरीनें वागत असत अशीं उदाहरणें इतिहासांत सांपडतात; मग सामान्य लोकांनीं तर या गोष्टीकडे किती लक्ष दिलें पाहिजे हें सांगावयास नको! महा-पराक्रमी शिकंदर बादशाहा याचा पोषाख त्याच्या हाताखालच्या कामगारांच्या पोषाखाच्या किंमतीचाच सरासरी असे. रोम शहरचा एक प्रख्यात् कॉन्सल ( माजिस्ट्रेट ) होता, त्यानें चार रुपयांपेक्षां जास्त किंमतीचा झगा कधींही घातला नाहीं. आणखी तो असेंही म्हणे कीं, ' ज्याची मला गरज नाहीं असा पदार्थ कितीही स्वस्त मिळत असला तरी तो मला महागच आहे असें मी समजतों, व तो मी कधींही घेणार नाहीं. तसेंच रोमचा महाप्रख्यात बादशाहा आगस्टस सीझर हा, त्याचे वेळीं जेवढी पृथ्वी माहीत होती तेवढीचा मालक होता तरी, त्याचे कपडे खुद्द त्याची बायको व मुलगी हीं तयार करीत, व त्याचा बिछाना तर अगदीं साधारण मनुष्याच्या बिछान्यापेक्षां मुळींच जास्त किंमतीचा नसे. त्याचप्रमाणें आस्ट्रि-याच्या गादीचा मूळपुरुष रोडोल्फ व त्याचा वंशज पांचवा चार्लस आणि फ्रान्स देशाचा राजा अकरावा लुई, अशा मोठमोठ्या लोकांचे पोषाख फारच साधे असत. तथापि हे सर्व पुरुष, कारण-परत्वें कितीही खर्च पडला तरी तो करण्यास मागें पुढें पाहणारे होते असें नाहीं. तात्पर्य, मनुष्यानें भलत्याच वेळीं काटकसर करून कृपणपणाचा दोष पदरीं घेऊं नये, तर जो खर्च केल्यावांचून चालण्या-सारखें असेल, तो होतां होईपर्यंत टाळावा, ही गोष्ट सर्वांनीं सदोदीत लक्षांत ठेवावी.

---

# उद्योगाची प्रशंसा.

## आर्या.

सान असो थोर असो पाप असो पुण्य वा असो त्यांत
उद्योगाविण नोहे कार्य पहा शोध करुनि हृद्यांत. १

निजगेहीं धान्याचा कण न्याया श्रम पिपीलिकेस जसा
राज्य स्थापायाला मनुजांनाही पडे उदंड तसा. २

मोठ्या मोठ्या मात्रा लोकांचे रोग सत्वरी हरिती
शस्त्रास्त्रें प्राण्यांतें न लागतां पळही नष्ट कीं करिती. ३

त्या मात्रा तैशीं तीं शस्त्रास्त्रें चांगलीं करायास
उद्योग पाहिजे तो वैद्यांतें आणि शस्त्रकारांस. ४

समईंत तेलवातहि असतां जर सारिली न ती वात
न पडे प्रकाश मोठा ही आहे ठाउकी जनां मात. ५

## श्लोक.

मोठा सिंह पराक्रमी सकळही प्राणी तयातें भिती
त्याच्या ऐकुनियां रैवा थरथरां जीवाभयें कांपती
भक्ष्यासाठीं फिरावयासहि वनीं त्या प्रत्यहीं लागतें
केल्यावांचुन कष्ट सौख्य न घडे तात्पर्य हें भासतें. ६

हें आणोनि मनीं करा निशिदिनीं उद्योग हा चांगला
विश्वेशावरती धरा भरंवसा आधार चित्ता भला
ज्या धीरीं दृढ निश्चया धरुनियां उद्योग केले महा
त्यांतें त्यांत दिलें यश प्रभुवरें हें दिव्यदृष्टी पहा ! ७

## आर्या.

उद्योगानें करितां येतें मनुजास पुण्य पाप तसें
त्यांतुन काय करावें हें कळणें ज्ञान यांत सर्व असे. ८

---

१. गोष्ट. २. शब्दास. ३. धैर्यवान पुरुषांनीं. ४. चांगल्या नजरेनें.

परमेश्वरें दिले हे विवेक कर पद करावया कामें
ऐशीं कीं तीं व्हावीं स्वपरांचीं सुखद कीर्तिकर धामें. ९
ऐशीं कार्यें करिती सोडुनियां निजहितावरी पाणी
त्यांची कथा कवींची आनंदेंकरुनि गाय कीं वाणी. १०
वाटे कीं मनुजाचा जन्म असे शुद्ध लोहसाच जरी
उद्योगपरिस त्याला स्वस्पर्शानें करी सुवर्ण तरी ! ११

श्लोक.

होते अजाण धनहीन अरण्यवासी
कीं नोव्हते विपुल अन्नहि खावयासी
पैश्वंब कीं निजतनूंवर घेत होते
झाले धनी प्रबळ भूप पहा अहो ते ! १२

आर्या.

याहुनि काय वदावें स्वपरहितीं करुनि शुद्ध उद्योग
जन सुरमान्यचि व्हावा तर जन्माचा जगांत उपयोग ! १३

---

# परोपकार.

प्रत्येक मनुष्यानें आपणास जी जी वस्तु लागेल तिजकरितां दुसऱ्यावर सहसा अवलंबून राहूं नये, हें वस्तुतः अगदीं बरोबर आहे. तथापि ईश्वरानें सर्व मनुष्यांचा एकमेकांशीं असा कांहीं संबंध लावून दिला आहे कीं त्यांनीं नेहमीं एकमेकांच्या सुखाची इच्छा करावी, व प्रसंगीं एकमेकांस साहाय्य करीत जावें.

मनुष्य कितीही काळजीपूर्वक वागत असला, तरी या जगांत त्याला कित्येक संकटें अशीं येण्याचा संभव आहे कीं, तीं आपल्याला

---

१. विचारशक्ति. २. घरें. ३. पशूंचीं कातडीं. ४. देवांस मान्य.

खात्रीनें टाळतां येतील असें कोणालाही म्हणतां येणार नाहीं. मनुष्य आजारी पडेल, त्याला दुखापत होईल, त्यानें केलेले बेत फसतील, त्याला दारिद्य येईल, अशी अनेक संकटें त्याला येण्याचा संभव आहे. अशा प्रसंगीं इतरांनीं त्याजवर आलेलें संकट दूर करण्यास आपापल्या शक्तीप्रमाणें त्यास साहाय्य करावें हें उचित आहे. अशा योगानें तो संकटांत पडलेला मनुष्य लवकर त्यांतून मुक्त होतो, व ज्यांनीं त्यास साहाय्य केलें असतें त्यांनाही मोठें समाधान वाटतें; कां तर, आपणापासून दुसऱ्यास उपयोग झाला हें पाहून मनुष्याच्या अंतःकरणाची अशा प्रकारची वृत्ति होणें अगदीं साहजिक आहे.

परमेश्वरानें सर्व मनुष्यें सारख्याच स्थितींत उत्पन्न केलीं आहेत असें नाहीं. कोणी शरीरानें व मनानें सदृढ असतात, कोणी दुर्बल असतात; कोणाच्या हातून फार करून चूक होत नाहीं, कोणाच्या हातून ती पुष्कळ वेळां होते; कोणाला त्याच्या आईबापांकडून विद्या व धन हीं प्राप्त होतात, कोणाला या दोहोंपैकीं एकच मिळतें, व कोणाला कांहींच मिळत नाहीं. मनुष्याविषयीं जी ही गोष्ट सांगितली, तीच पण राष्ट्रालाही लागू आहे. जें राष्ट्र सुधारलेलें असतें, त्यांतील पुष्कळ लोक सुखी असतात; व जें रानटी स्थितींत असतें, त्यांतील बहुतेक लोकांचे हाल कुत्रा खाणार नाहीं असें असतें. यास्तव आपणां सर्वांस व्यक्तिमात्राच्या अथवा राष्ट्राच्या, कोणत्याही नात्यानें म्हणा, दुसऱ्याच्या सुखदुःखांचा विचार करणें–म्हणजे जे शक्तिमान् असतील त्यांनीं दुर्बलांस साहाय्य करणें, जे सद्गुणसंपन्न असतील त्यांनीं जे वाईट असतील त्यांची सुधारणा करणें, श्रीमंत असतील त्यांनीं गरीबांचा समाचार घेणें, व जे सुधारलेले असतील त्यांनीं अडाण्यांस ज्ञान प्राप्त करून देणें–हें उचित आहे.

पण ह्या गोष्टीमध्यें आपणांस सारासारविचारानें वागण्याविषयींहि खबरदारी घेतली पाहिजे. उदाहरण, आपल्या मनांत कांहीं धर्म करा-

बयाचें आलें, तर त्यापासून आळसास उत्तेजन येईल अथवा दुर्गुणांस मदत होईल असें असेल, तर तशा ठिकाणीं धर्म न करावा हें बरें. तात्पर्य, आपण जें कांहीं कोणाला देतों अथवा कोणाच्या बऱ्याकरितां जें कांहीं करितों, तें सत्पात्रीं पडेल—म्हणजे त्यापासून चांगलाच परिणाम होईल, वाईट कदापि होणार नाहीं, असें असलें पाहिजे.

## सर फिलिप सिडनी.

सर फिलिप सिडनी या नांवाचा एक प्रसिद्ध पुरुष, इंग्लंडची विख्यात राणी इलिझाबेथ हिच्या कारकीर्दींत होऊन गेला. तो मोठा योद्धा व कवि असून परोपकार, दया, इत्यादि गुणांविषयीं त्याची फार ख्याति होती, तो इ० स० १५५६ मध्यें राणीच्या हुकुमावरून, डच लोकांच्या वतीनें स्पानिअर्ड लोकांशीं लढत असतां झटफेन् * येथील निकराच्या लढाईंत त्याचे एकामागून एक असे दोन घोडे मरण पावले. तेव्हां तो तिसऱ्यावर बसला असतां त्यास मोठी जखम झाली व तींतून भळभळां रक्त वाहूं लागलें, आणि त्यायोगानें त्याला मूर्च्छा आली. तेव्हां लोकांनीं त्याला लागलेंच छावणीकडे नेलें. त्या वेळीं त्याला अतिशय तहान लागली होती, पण अशा प्रसंगीं पाणी ताबडतोब कोठून मिळणार ? इतक्यांत कोणीएकानें थोडेंसें पाणी आणून त्याला दिलें. तो पाण्याचा पेला तोंडाला लावतो आहे तों जवळच एक जखमी झालेला शिपाई नुकताच तेथें आणलेला होता त्याचें लक्ष्य त्या पेल्याकडे जाऊन त्यानें खिन्नवदन केलें. हें पाहून सर फिलिफ यानें आपल्या ओठाला लावलेला तो पेला तसाच घेऊन त्या शिपायास दिला आणि म्हणाला, ‘ मजपेक्षां तुला ह्याची गरज अधिक आहे, याकरितां तूंच हा घे ! ’

सर फिलिप याची ती जखम असाध्य होऊन तिच्या योगानें तो

* हें शहर हॉलंड देशांत आहे.

मरण पावला. त्याचें वय त्या वेळीं केवळ तेहतीस वर्षांचें होतें. पण वर सांगितलेल्या प्रसंगीं त्यानें जें अनुपम औदार्य दाखविलें, त्याच्या योगानें हा काळपर्यंत त्याचें नांव लोकांत निघत आहे !

## जार्ज ड्रूमंड.

इसवी सन १७५० च्या सुमारास एडिंबर्ग शहरांत जॉर्ज ड्रूमंड या नांवाचा गृहस्थ मुख्य मॅजिस्ट्रेट होता. तो एके दिवशीं शहरांतून चालला असतां कोणा गरिबाचें प्रेत स्मशानभूमीकडे चाललेलें त्याला आढळलें. तें नेणारे फक्त चार गरीब म्हातारे इसम असून त्यांना मध्यंतरीं विसांवा देण्याकरितां अथवा प्रेताबरोबर नुसतें जाण्याकरितांही कोणी मनुष्य नव्हतें. यावरून ड्रूमंड याच्या लक्षांत आलें कीं, हें कोणा अनाथाचें प्रेत असावें. तेव्हां तो त्या चौघां म्हाताऱ्यांपाशीं जाऊन त्यांस म्हणाला 'बाबांनों, या मृत मनुष्याबरोबर स्मशानभूमीपर्यंत जाण्यास याचे इष्टमित्र कोणी नाहींत, याकरितां तें काम मीच करितों. ' असें म्हणून, जे लोक प्रेत घेऊन चालले होते त्यांच्या पुढें तो झाला. ते फारसे दूर गेले नाहींत तोंच मॅजिस्ट्रेटाच्या ओळखीचे दोन गृहस्थ त्यांस भेटले, व आपण हें काय करीत आहां असें त्यांनीं त्यास विचारिलें. त्यानें उत्तर केलें, 'या अनाथ प्रेताचा अंत्यसंस्कार करण्यास कोणी नाहीं, याकरितां मी तो करण्यास चाललों आहें.' हें ऐकून त्या दोघां गृहस्थांस मोठें आश्चर्य वाटलें, व तेही त्या प्रेताबरोबर चालले, अशाच प्रकारें आणखी कित्येक लोक आले, व स्मशानभूमीस पोहोंचण्याच्या वेळेपर्यंत एकंदर बराच समाज जमला. तेथें गेल्यावर ड्रूमंड ह्यानें स्वतः आपल्या हातांनीं त्या प्रेतास व्यवस्थेशीर रीतीनें मूठमाती दिली. हें कृत्य उरकल्यावर या मनुष्यास कोणी बायकापोरें आहेत काय, अशी त्यानें चौकशी करितां त्याला समजलें कीं, त्याला एक फक्त बायको असून ती म्हातारी, पंगू व

अगदीं निराश्रित अशी आहे. यावरून ड्रमंड हा तेथें जमलेल्या लोकांस उद्देशून म्हणाला, ' सद्गृहस्थहो ! आपण आज येथें जमण्याचा मोठा चमत्कारिक प्रसंग आला आहे. ज्याकरितां आपण आलों तें काम तर झालेंच; व तें आपण केलें नसतें तथापि कसें तरी बऱ्यावाईट रीतीनें झालेंच असतें. पण आतां आपण आपल्या वरीं जाण्यापूर्वीं, या मनुष्याच्या गरीब बायकोची कांहीं तरी तजवीज लाविली असतां फार चांगलें होईल. प्रत्येकानें थोडेंथोडें दिलें तरी बरीच रक्कम जमेल, व तिचा उपयोग त्या बाईला योग्य रीतीनें होईल. अशी तजवीज करण्याची जबाबदारी मी स्वतः घेतों. हे त्याच्या तोंडचे शब्द ऐकतांच सर्वांनीं भराभर आंकडे टाकिले, व त्या धर्मकृत्यास चांगलीच रक्कम जमली. ती मॅजिस्ट्रेटानें त्या अनाथ स्त्रीकडे पोहोंचवून तिची अडचण दूर केली. पुढें त्यानें तिच्या बेताचें कांहीं काम तिला लावून देऊन, तिचा चरितार्थ स्वतंत्र रीतीनें चालेल अशी तिची सोय करून दिली. असे परोपकारी पुरुष जगांत विरळा. अशांचा धन्यवाद जितका गावा तितका थोडाच.

## टामस क्लार्कसन.

इ. स. १७८५ ह्या वर्षापूर्वीं गुलाम बाळगणें हें अयोग्य आहे, असें पुष्कळांस वाटत नव्हतें. त्या वेळेपर्यंत वेस्ट इंडीज बेटामध्यें युरोपियन लोक गुलाम बाळगून त्यांजपासून गुराप्रमाणें कामें करून घेत असत. तसेंच हे लोक प्रतिवर्षीं आफ्रिकेंतून शेंकडों शिद्दी लोकांस धरून आणून गुलामांचा व्यापार मोठ्या झपाट्यानें करीत असत.

त्याच वर्षीं केंब्रीज येथील एका विद्यालयांत, 'दुसऱ्यास जबरदस्तीनें गुलाम करणें ही गोष्ट न्यायाची आहे काय ?' यावर जो कोणीं उत्तम निबंध लिहील त्यास एक बक्षीस ठेवण्यांत आलें होतें.

तेथील विद्यार्थ्यांत टामस क्लार्कसन या नांवाचा एक विद्यार्थी होता, त्यानें मोठे परिश्रम करून या विषयाची माहिती मिळविली, व त्याचा निबंध सर्वांत उत्तम ठरून त्यास बक्षीस मिळालें, तेव्हां-पासून या विषयाकडे त्याचें मन फारच वेधलें. तो पुढें लंडनास यावयास निघाला. वाटेनें येतांना त्याच्या मनात नानाप्रकारचे तरंग आले. आपण निबंधांत गुलामांच्या व्यापाराचा निषेध प्रतिपादन केला आहे तो वास्तविक आहे कीं नाहीं, याविषयीं त्याचा त्यासच संशय पडला. पण शेवटीं तो अगदीं वास्तविक आहे, व आपण निबंधांत निर्णय केला आहे त्यांत बिलकूल चूक नाहीं, अशी त्याची खात्री झाली. यावरून त्यानें विचार केला कीं, अशी जर गोष्ट आहे, तर गरीब बिचाऱ्या आफ्रिकन लोकांविषयीं युरोपियन लोकांनीं हा जो निर्दयपणाचा व निवळ अन्यायाचा प्रकार चाल-विला आहे तो बंद करण्याच्या कामीं झटणें हें प्रत्येक सदय व न्यायी मनुष्याचें काम आहे. तो लंडनास येऊन पोहोंचला. तों त्याचें मन त्या दुष्ट चालीच्या संबंधानें अत्यंत क्षुब्ध झालें. पुढें लवकरच त्यानें आपला निबंध छापून प्रसिद्ध केला. त्याची पुष्क-ळांनीं वाहवा केली, त्या गोष्टीकडे लोकांचें बरेंच लक्ष लागलेसें दिसलें; तथापि पुढें क्लार्कसन याच्या लक्ष्यांत आलें कीं, नुसता निबंध प्रसिद्ध केल्यानें कांहीं विशेष उपयोग होण्याचा संभव नाहीं. गुलामांचा व्यापार अजीबात बंद करण्यास म्हटलें म्हणजे याहून मोठमोठे प्रयत्न झाले पाहिजेत, व ते करण्याला कोणीं तरी आपलें तनमनधन खर्च केलें पाहिजे. पण तें कोणीं करावें हा प्रश्न निघा-लाच. शेवटीं विचार करितां करितां या प्रश्नाचा निकाल आपला आपणच केला पाहिजे, असें त्यास दिसून आलें; मग त्यानें एकांतीं बसून याविषयीं आणखी पुष्कळ विचार केला. तेव्हां याचा असा निश्चय झाला कीं, या खटपटींत कारण पडल्यास आपलें सर्वस्व खर्चे

करावयाचें; व याप्रमाणें तो ताबडतोब आपल्या उद्योगास लागला.

क्लार्कसन यानें गुलामांचा व्यापार बंद करण्याकरितां खटपट करणारी एक मंडळी स्थापन केली. तिचे सभासद पुष्कळ वजनदार गृहस्थ झाले. या मंडळीनें सभा भरवून, गुलामांच्या व्यापाराचें यथातथ्य वर्णन प्रसिद्ध करून, व त्याविरुद्ध असणाऱ्या गोष्टी समर्पक रीतीनें सिद्ध करून दाखवून, बहुतेक लोकांचीं मतें आपल्यासारखीं केलीं. क्लार्कसन हा या सभेचा चिटणीस असल्यामुळें त्याजवरच बहुतेक कामाचा बोजा पडत असे. त्यानें सहा वर्षेपर्यंत अश्रांत श्रम केल्याकारणानें त्याची शरीरप्रकृति क्षीण झाली, त्याला ऐकावयास कमी येऊं लागलें, त्याचा आवाज हलका पडला, व त्याची स्मरणशक्ति बहुतेक नष्ट झाली. तेव्हां त्याला आपली प्रकृति सुधारण्याकरितां नाइलाजास्तव कांहीं दिवस विश्रांति घेणें भाग पडलें. पुढें आठ वर्षांनीं तो पूर्ववत् हुशार झाल्यावर पुनः आपल्या परोपकाराच्या कामास लागला. तो आजारी पडून घरांत निजून राहिला असतां, गुलामांच्या व्यापारांत ज्यांचें हिताहित होतें त्यांजकडून त्याला फार त्रास झाला, व कित्येक वेळां तर त्याच्या जिवावरही येऊन बेतली होती. असो; शेवटीं त्याचा हा अत्यंत स्तुत्य प्रयत्न उत्तम प्रकारें फलप्रद झाला. तो असा कीं, सन १८०७ मध्यें पार्लमेंटानें, गुलामांचा व्यापार ब्रिटिश अमलांतील सर्व प्रांतांत बंद केल्याचा कायदा केला; व हें ब्रिटिश सरकारचें उदाहरण पाहून युरोपांतील इतर राष्ट्रांनीं थोड्याच वर्षांत आपल्या ताब्यांतील सर्व प्रांतांत गुलामगिरी बंद करून टाकिली. यापूर्वीं वीस वर्षें हा गुलामांचा व्यापार बंद होण्याची नुसती गोष्ट जर कोणीं काढली असती, तर ती केवळ आकाशाची मोट बांधण्यासारखी लोकांना वाटली असती ! असो; तर याप्रमाणें ज्याच्या योगानें मानवजातीचें येवढें मोठें दुःख कमी झालें, अशा त्या उदार अंतःकरणाच्या पुरु-

षाचा महिमा किती म्हणून वर्णावा ! अशीं मनुष्यें जगास केवळ भूषणें होत !

## एका मनुष्यानें हजारों लोकांचे प्राण वांचविले !

प्राचीन काळीं रोमन लोकांमध्यें एक मोठा खेळ करीत असत. त्याला खेळ म्हणण्यापेक्षां 'खुनाचा देखावा' असें म्हटलें असतां चालेल. हा खेळ त्या वेळच्या चालीच्या अर्धवर्तुलाकृति अशा मोठ्या रंगभूमीवर करीत असत. तो पहावयास लहान मोठे सर्व लोक—राजे व अमीरउमराव, सेनापति व शिपाई, कारागीर व मजूर —येत असत; इतकेंच नव्हे, तर बायकामुलेंही येत असत, व त्या खेळांतील दुष्ट प्रकार पाहून त्यांस वाईट न वाटतां उलटी गंमत वाटत असे ! हा खेळ असा होता कीं, भले मोठमोठे धिप्पाड, बळकट व शूर असे लोक एकत्र जमून त्यांपैकीं दोघां दोघांनीं क्रूर वनपशूंप्रमाणें एकमेकांशीं प्राण जाईपर्यंत लढावयाचें. ह्या खेळ करणाऱ्या लोकांस 'ग्लाडिएटर' अशी संज्ञा असे. वर सांगितल्याप्रमाणें त्यांचीं द्वंद्वयुद्धें होऊन दोघांपैकीं एक चीत झाला म्हणजे त्या चीत झालेल्या मनुष्यास मारून टाकावयाचें किंवा सोडून द्यावयाचें याबद्दल प्रेक्षक लोकांचें काय म्हणणें आहे तें समजण्याकरितां विजयी झालेला मनुष्य त्यांजकडे नजर फेंकी. मग संकेताप्रमाणें लोकांनीं आपले आंगठे वर केले तर पडलेल्या मनुष्यास त्याचा प्रतिस्पर्धी तसाच सोडून देई, व त्यांनीं जर आपले आंगठे खालीं केले, तर त्यास तो आपल्या तरवारीनें एका घावासारखा मारून टाकी ! केव्हां केव्हां तो धरणीवर पडलेला मनुष्य भयानें आपलें अंग चोरून इकडे तिकडे करूं लागला तर, लोक मोठ्यानें ओरडून म्हणत 'हँ! खबरदार नानू करशील तर ! निमूटपणें वार सोसला पाहिजे !'

इ० स० ४०३ या वर्षी गाथ नांवाच्या रानटी क्रूर लोकांनीं

इतालीच्या आसपासच्या देशांवर स्वाऱ्या करून पुष्कळ मुलूख काबीज केला. शेवटीं खुद्द इतालींतही ते शिरले, व रोम शहरावर चाल करून येऊं लागले, तेव्हां तेथील बादशहा केवळ अल्पवयी असल्यामुळें, आतां शहराचें रक्षण कसें होतें याविषयीं लोकांस मोठी चिंता पडली. पण त्या बादशाहाचा सेनापति स्टिलिको या नांवाचा मोठा शूर व धारिष्टवान् पुरुष होता, त्यानें त्या लोकांशीं सामना करून त्यांजवर पूर्ण जय मिळविला, व रोम शहराचा बचाव केला. तेव्हां त्या वेळेच्या तेथल्या रिवाजाप्रमाणें रोम शहरच्या लोकांनीं सेनापतीस मोठ्या थाटानें नगरांत मिरवीत आणिलें, व त्याच्या सन्मानार्थ निरनिराळ्या प्रकाराच्या शर्यती व इतर खेळ झाल्यानंतर वर सांगितलेल्या 'ग्लाडिएटर' लोकांचा खेळ करण्याची तयारी झाली. ते लोक खेळाचे जागीं येतांच तेथें जमलेल्या लोकांनीं मोठा आनंदघोष केला. इतक्यांत अगदीं साधा पोषाख केलेला असा एक म्हातारा मनुष्य त्या ठिकाणीं आला. त्यानें त्या खेळ करण्याकरितां आलेल्या लोकांस मागें हटण्यास सांगितलें, व हें असलें घोर कृत्य आजपासून बंद करावें म्हणून प्रेक्षकसमुदायाची तो प्रार्थना करूं लागला. तो म्हणाला,'अहो महाराज! आपले शत्रू गाथ लोक यांजवर आपणांस परमेश्वरानें जय मिळवून दिला, हे त्याचे उपकार आपण चांगलीं कृत्यें करून स्मरावे, कां अशा प्रकारें खून पाडवून स्मरावे बरें?' तो इतकें बोलला तथापि त्याकडे कोणींही लक्ष दिलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर सर्व लोक मोठमोठ्यानें आरोळ्या मारूं लागले, आणि, 'खेळ्यांनो! या म्हातारड्याचें काय ऐकतां? या तुम्ही पुढें आणि आपला पराक्रम दाखवा!' असें मोठ्या आवेशानें म्हणूं लागले. तेव्हां ते पुढें येऊन त्यांनीं त्या म्हाताऱ्यास एकीकडे ढकलिलें, आणि लढावयास सुरुवात केली. तथापि तो वृद्ध मनुष्य पुनः पहिल्या जागीं येऊन उभा राहिला,

आणि त्या लढणाऱ्या लोकांस दूर करून, आपलें म्हणणें लोकांनीं ऐकावें म्हणून यत्न करूं लागला. पण लोक कसचे ऐकतात ? त्यांनीं ओरडून म्हटलें, ' मारून टाका, त्या थेरड्याला ! ' हें ऐकतांच आपले प्राण वांचविण्याकरितां आलेल्या त्या बिचाऱ्या म्हाताऱ्यावर त्या ' ग्लाडिएटर ' लोकांनीं एकदम तरवारी चालवून त्यास तेथल्या तेथें ठार केलें !

जगांत आजपर्यंत अनेक साधु होऊन गेले, पण त्यांपैकीं पुष्कळ ' स्वार्थसाधु ' च होते असें म्हटलें पाहिजे; कां कीं, त्यांनीं फार तर स्वतःच्या मुक्तीकरितां यत्न केला असेल. पण परोपकाराकरितां ज्यांनीं आपलें आयुष्य खर्च केलें, असे फार थोडे. अशा महात्म्यां-पैकीं हा वरील गृहस्थ होता. मनुष्यांनीं एकमेकांस मारावें व ती मौज लोकांनीं पहावी या गोष्टीचा त्याला अत्यंत तिरस्कार वाटून, हें दुष्ट कृत्य बंद करीन किंवा मरेन असा त्यानें निश्चय केला होता, व तो आपल्या निश्चयाप्रमाणें मरण पावला खरा; परंतु तो फुकट मरण पावला असें मात्र झालें नाहीं. त्याचा इष्ट हेतु सिद्धीस गेलाच. तो असा कीं, त्याचा अशा प्रकारें अंत झालेला पाहून लोकांचे डोळे उघडले, व त्यांना ह्या आपल्या निर्दयपणाच्या खेळाबद्दल वाईट वाटूं लागलें; तें इतकें कीं, पुनः म्हणून त्या ठिकाणीं ' ग्लाडिएटर ' लोकांचा तो जीव घेणारा खेळ कधींही झाला नाहीं. पहा, ह्या एकट्या गरीब मनुष्याच्या परोपकाराच्या कृत्यास केवढें फळ आलें कीं, मनुष्यमात्रास काळिमा आणणारा हा शेंकडों वर्षें चालत आलेला क्रूर प्रकार जगांतून अजीबात नाहींसा झाला !

---

# ही वेळ आहे.

श्लोक.

जनीं चालती शेंकडों बालशाला
मुलें शीकती त्यांत विद्या विशाळा
दिसे पाहतां मौज मोठी तयांची
अशी वेळ नाहीं पुनः यावयाची ! १

जयां नोव्हतें येत वाचावयाला
मुलांना तयांच्याही वेदान्त आला !
तयांतें कळे स्वस्थिती काय सांची
अशी वेळ नाहीं पुनः यावयाची ! २

नको काळजी रक्षणाची वहाया
नको न्यायनीतीस लोकीं पहाया
प्रभू ठेविताती व्यवस्था तयांची
अशी वेळ नाहीं पुनः यावयाची ! ३

गमे योग्य तें निर्भयत्वें वदावें
कुढोनी स्वचित्तीं न लागे पडावें
जणों जाहलों आज जन्मांत वांची
अशी वेळ नाहीं पुनः यावयाची ! ४

मना जें गमे चांगलें तें करावें
तयाला कधीं आड कोणीं न यावें !
स्वसत्ता स्वकर्मीं स्वधर्मीं जनाची
अशी वेळ नाहीं पुनः यावयाची ! ५

उठा कंबरा निश्चयें नीट बांधा
हितातें स्वराष्ट्राचिया तूर्ण साधा

---

१ खरी. २ राज्यकर्ते. ३ बोलावयास समर्थ.

उभारा पताका[1] जगीं सद्यशाची
अशी वेळ नाहीं पुनः यावयाची ! ६
करावें कसें काय हें दाखवाया
दिले राजकर्ते तुम्हांला पहाया
तयांसारखे व्हा गुणी निश्चयेंसी
स्वयें उन्नती[2] धांव घेईल देशीं ! ७

---

## सहनशीलता, क्षमा व दया.

परमेश्वरानें सर्व प्राण्यांच्या ठायीं असा कांहीं मनोधर्म ठेविला आहे कीं, त्यांना कांहीं वाईट वाटण्यासारखी गोष्ट कोणीं केली असतां त्यांना राग यावा, व त्यांच्या अंतःकरणाला आनंद देणारी गोष्ट कोणीं केली असतां तिजपासून त्यांना समाधान वाटावें. उदाहरणार्थ, जर एकादें न्यायाचें अथवा प्रामाणिकपणाचें कृत्य कोणीं केलेलें आपल्या दृष्टीस पडलें अथवा आपल्या कानीं आलें, तर त्याविषयीं आपल्या मनाला आनंद वाटतो; व याच्या उलट, अन्यायाचें अथवा अप्रामाणिकपणाचें कृत्य कोणीं केलेलें आपल्या नजरेस आलें, तर आपल्या मनाला वाईट वाटतें व आपल्याला राग येतो. यावरून राग हा जो प्राण्यांचा स्वभावधर्म आहे, त्याचा जगांत उपयोग आहे असें सिद्ध होतें; म्हणजे कोणत्याही वाईट गोष्टीबद्दल दुःख अथवा धिक्कार प्रदर्शित करण्याचें हें एक साधनच आहे. आणि खरोखर, ज्या मनुष्याविषयीं अथवा वस्तूविषयीं आपल्या मनांत पूज्यभाव आहे, अशांना कोणाकडून त्रास अथवा इजा झाली, अथवा त्यांचा कोणीं अपमान केला, व त्याबद्दल जर आपल्य

---

1 ध्वज, निशाण. २ उत्कर्ष, भरभराट.

मनाला कांहींच वाटलें नाहीं, तर आपल्यासारखा मेषमात्र प्राणी जगांत नाहीं असें म्हटलें पाहिजे !

परंतु याप्रमाणें योग्य प्रसंगीं राग येणें हें जरी साहजिक व वाजवी आहे, तरी तो राग आपण मर्यादित ठेविला पाहिजे, व त्याच्या आवेशांत कांहीं भलतेंच कृत्य आपल्या हातून न होईल अशाविषयीं फार खबरदारी ठेविली पाहिजे. कारण म्हण आहे कीं,

' अति रागा भीक मागा, त्याहून रागा देश त्यागा ! '

तसेंच राग आला असतां त्यासंबंधानें मनांत फार वेळ कुढत बसणें हेंही अगदीं बरोबर नाहीं. ती वेळ गेली म्हणजे लागलाच आपल्याला त्या गोष्टीचा विसर पडला पाहिजे.

रागाची मनोवृत्ति प्रकट करण्याचे जे प्रकार आहेत, ते प्रत्येक मनुष्याच्या स्थितीप्रमाणें निरनिराळे आहेत, म्हणजे जो अगदीं अशिक्षित व रानदांडगा असतो, तो राग आला म्हणजे शिवीगाळ करितो, प्रसंगविशेषीं मारामारीही करितो, पण ज्याला शिक्षणाचा थोडाबहुत संस्कार झालेला असतो व चारचौघांत कसें वागावें व कसें बोलावें हें ज्याला थोडेंबहुत समजतें, तो शिवीगाळ किंवा मारामारी करीत नाहीं, तर ज्यानें त्यास राग येण्यासारखें कृत्य केलें असेल त्याला मर्मी लागेल अशा प्रकारें कधीं कधीं टोंचून बोलतो, त्याच्याशीं मनांत चुरस धरतो. पण वास्तविक पाहतां हे दोन्ही प्रकार गैर आहेत. शिवीगाळ अथवा मारामारी करून लोकांस तमाशा दाखविणें, त्याचप्रमाणें मर्मभेद करणें अथवा चुरस धरणें, यांपासून कांहीं चांगला परिणाम घडण्याचा संभव मुळींच नाहीं; होईल तर त्यापासून अनिष्टच परिणाम होईल. म्हणून वाजवी गोष्टीकरितां आलेला राग प्रदर्शित करावयाचा तो, शांत परंतु स्पष्ट रीतीनें त्या-बद्दलचीं आपलीं कारणें सांगून प्रदर्शित करावा; म्हणजे ज्याच्या हातून अपराध घडला असेल त्याच्या मनांत आपल्याविषयीं वाईट

ग्रह होणार नाहीं, व तो मनांत बोध घेऊन स्वतःची सुधारणा करील.

त्रासिक, रागीट व खुनशी असा मनुष्याचा स्वभाव असला तर त्यापासून त्याच्या मनावर व शरीरप्रकृतीवरही वाईट परिणाम होतात. याकरितां नेहमीं मनुष्यानें होईल तितकी मनाची समता व शांतता ठेवण्याविषयीं झटावें. त्यापासून फार हित आहे. जगाची साधारण स्थिति अशी आहे कीं, आपल्याला न आवडणाऱ्या अशा शेंकडों गोष्टी नित्यशः आपल्या डोळ्यांसमोर घडत असतात. तर घटकोघटकीं जर आपण रागानें डोकें तापविलें, तर आपली स्थिति फार वाईट होऊन खेरीज आपल्या सहवासाला असणाऱ्या मनुष्यांनाही त्यापासून त्रास होईल. शांत व गोड स्वभाव असणें आणि मनाला अस्वस्थता देणाऱ्या गोष्टींच्या संबंधानें शांतपणें विचार करून त्यांची युक्तीनें वाट लावणें, हें मनुष्यास फार भूषणास्पद आहे. एके ठिकाणीं म्हटलें आहे. ' राग आला तर बोलण्यापूर्वीं मनांत दहा अंक मोज, आणि फार राग आला तर शंभर मोज, म्हणजे रागाच्या योगानें तुझे हातून कधीं पाप होणार नाहीं.'

दुसऱ्यानें अपकार केला असतां त्याबद्दल कानाडोळा करणें क्षमा करणें, अथवा त्याजवर उलटी दया करणें, हें अत्यंत थोरपणाचें चिन्ह होय. चुकीला प्रत्येक मनुष्य पात्र आहे; याकरितां अशा प्रकारची मनोवृत्ति अंगीं असल्यास तिजपासून सर्वांना सुख होणार आहे. सूड उगवण्यापासून एकाच्या ठिकाणीं दोन वाईट कृत्यें घडतात; पण क्षमाशीलतेच्या योगानें दुसरें वाईट कृत्य घडत नाहीं इतकेंच नाहीं, तर पहिलें जें घडलें असतें तें सुधारण्याचाही संभव असतो. क्षमा व दया यांच्या योगानें शत्रु असतात ते मित्र होतात, व क्षमाशील मनुष्याचें उदाहरण पाहून दुसरें लोक याचा कित्ता घेतात; आणि एकंदरींत जगाच्या सुखाची त्यापासून वृद्धि होते. तसेंच कांहीं एकाद्या गोष्टीनें आपणास राग आला असतां ती गोष्ट

करणाऱ्याला आपण त्याबद्दल बोलण्यापूर्वीं त्यानें तशी गोष्ट करण्याला आपल्या हातून कांहीं कारण घडलें आहे कीं काय हेंही पहात जावें. कारण पुष्कळ वेळां असें घडतें कीं, अशा प्रसंगीं आपली स्वतःचीही चूक असते, व ती विचारअंतीं आपणांला समजणारी असते. तेव्हां आपण विचार करण्याची संवय ठेविली म्हणजे दुसऱ्यावर जहाल जाण्याचा प्रसंग बहुधा येणारच नाहीं. याविषयीं एक म्हण आहे कीं, ' अगोदर आपल्या गुडघ्याशीं भांडावें, मग दुसऱ्यास दोष द्यावा. ' ही म्हण सर्वांनीं लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

ग्रीस देशांतील महान् तत्त्ववेत्ता साक्रेतीस ह्यानें विचारानें व अभ्यासानें आपला राग स्वाधीन ठेवण्याची विलक्षण शक्ति अंगीं आणली होती. त्यानें आपल्या सर्व मित्रांस सांगून ठेविलें होतें कीं, ' मला आतां राग येणार असें तुम्हांला वाटल्याबरोबर तत्काळ त्याबद्दल तुम्ही मला इशारत करीत जा. ' याप्रमाणें रागाचे प्रसंगीं त्यांजकडून त्याला सूचना झाली म्हणजे लागलाच तो हळू बोलावयास लागे. नंतर अगदीं गुपचिप बसे. एके प्रसंगीं त्याच्या एका गुलामाचा कांहीं कारणांवरून त्याला अतिशय राग आला असतां तो गुलामास म्हणतो, ' या वेळीं मी रागांत नसतों तर तुला झोडपून काढिलें असतें ! ' त्याचप्रमाणें एकदा कोणी त्याच्या कानशिलांत मारिली, तेव्हां तो किंचित् हंसून म्हणाला, ' शिरस्त्राण कोणत्या वेळेस घालावयाचें हें माहीत नसणें ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे ! '

कोणे एके वेळीं तो रस्त्यानें चालला असतां कोणी मोठ्या पदवीचा गृहस्थ त्यास भेटला. त्याला साक्रेतिसानें सलाम केला, परंतु त्या गृहस्थानें तिकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं, व तो तसाच पुढें चालता झाला. तेव्हां साक्रेतिसाचे मित्र त्याजबरोबर चालले होते ते त्यास म्हणाले, ' अहो, त्या मनुष्याचा उद्दामपणा पाहून

आमचें पित्त इतकें खवळून गेलें होतें कीं, आम्ही त्याचा चांगला समाचार घेण्याच्या बेतांत होतों.' पण साक्रेतीस त्यांस शांतपणें म्हणाला, 'बाबांनो! जर एकादा मनुष्य तुमच्याहून निराळ्या तऱ्हेचा पोषाख करून चाललेला रस्त्यांत तुम्हांला आढळला, तर तुम्हांस त्याजवर रागावण्याचें कांहीं कारण आहे काय? अर्थात्च नाहीं. तर यांप्रमाणेंच तुमच्याहून ज्याच्या अंतःकरणाचें स्वरूप भिन्न आहे, त्यांवर तरी तुम्हांला रागावण्यास कोणतें सबळ कारण आहे बरें?'

परंतु साक्रेतीस यास बाहेरच्यापेक्षां घरांतच आपल्या सहनशीलतेची कसोटी पाहण्याचा वारंवार प्रसंग येत असे. त्याची झांटिपी नांवाची बायको होती, ती पराकाष्ठेची भांडखोर व रागीट होती; ती इतकी कीं, तिच्यासारखी कैदाशीण जगांत आजपर्यंत झाली असेल किंवा नाहीं ह्याची शंका आहे! तिच्यापासून साक्रेतीस ह्यास कोणत्या एका प्रकारचा त्रास झाला नाहीं, असें नाहीं. एके वेळीं तिचा राग इतक्या थरास जाऊन पोंहोंचला कीं, तिनें भररस्त्यांत त्याच्या अंगांतला आंगरखा फाडून टाकिला! त्यावरून त्याच्या मित्रांनीं त्यास म्हटलें, 'अहो, आतां तर ही क्षमेच्या बाहेर गोष्ट गेली! या वेळेस तुम्ही तिला चांगला खरपूस चोप दिल्यावांचून राहूं नका' तेव्हां तो म्हणतो, 'हं, मग मात्र खासाच तमाशा होईल! ती व मी एकमेकांस मारूं लागलों म्हणजे तुमच्यासारखे मजा पाहणारे आम्हांस उत्तरोत्तर जास्तच चेव आणतील! एकजण म्हणेल, 'वाः, साक्रेतीस, भली केली!' दुसरा म्हणेल, 'झांटिपीबाई, चांगला रट्टा दिला!' पुढें असाच एकदा त्या महामायेला राग आला असतां तिनें त्याला शिव्यांची लाखोली वाहिली. तेव्हां तो कांहींएक न बोलतां घरांतून उठून दाराबाहेर मात्र येऊन बसला! त्यावरून तर ती अतिशयच खवळली, व तिनें एका मोठ्या

आंड्यांत घाणेरडें पाणी भरून तें त्याच्या डोक्यावर ओतलें ! हें पाहून तो हंसून म्हणाला, ' खरेंच ! एवढें मोठें आभाळ कडकडलें त्याअर्थी पाऊस पडावयाला पाहिजेच होता ! '

---

## दुसऱ्या एका तत्ववेत्याची गोष्ट.

स्वित्झर्लंड देशांतील जिनिवा नामक शहरीं एम्. अबोरेट ह्या नांवाचा एक तत्त्वज्ञानी होऊन गेला. त्याच्याही अंगीं अशाच प्रकारची विलक्षण सहनशीलता वसत होती. त्याच्या घरीं एक मोलकरीण होती, तिला राहून तीस वर्षें झालीं होतीं. तथापि इतक्या दिवसांत, मीं आपल्या धन्यास एकदाही रागावलेला पाहिला नाहीं, असें ती म्हणे. हा त्याचा लौकिक कित्येक कुटाळ लोकांस सहन होईना. सबब त्याला कसेंही करून एकदा तरी राग आणण्याची खटपट केली पाहिजे, असें त्यांनीं मनांत आणिलें. त्या कामाकरिता त्यांनीं त्या बाईचीच योजना करून तिला त्याबद्दल कांहीं देण्याचें कबूल केलें. तेव्हां आतां याची कुरापत कशी काढावी याविषयीं ती विचार करीत असतां तिच्या लक्ष्यांत आलें कीं, याला आपला बिछाना नीट व्यवस्थेशीर घातलेला असल्यावांचून चैन पडत नाहीं. मग तिनें मुद्दाम एके दिवशीं तो तसा घातला नाहीं. तेव्हां सकाळच्या प्रहरीं तिला त्यानें त्याचें कारण विचारलें. ती म्हणाली, ' माझ्या हातून चुकून तसें झालें. ' परंतु त्या दिवशीं रात्रींही पुनः तिनें तोच प्रकार केला. तेव्हां त्यानें दुसरे दिवशीं पहिल्याप्रमाणेंच तिला विचारिलें. फिरून पण तिनें तशीच कांहींतरी सबब सांगितली, व तीही नम्रतापूर्वक सांगितली नाहीं. मग तिसऱ्या वेळेसही तिनें तसेंच केलें असतां तो तिला म्हणाला, 'तूं ही गोष्ट मुद्दाम कांहीं उद्देशानें करीत आहेस असें खास दिसतें; पण बहुधा तुला

आढळून आलेंच असेल कीं, आपला हेतु कांहीं सिद्धीस जातां दिसत नाहीं; व मी आणखी तुला सांगतों कीं, आतां ही गोष्ट माझ्या संवयीची होत चालली आहे, यामुळें यापुढें मला तिचें कांहींच वाटणार नाहीं, आणि मी तुला याबद्दल कांहींएक बोलणार नाहीं. ' हें ऐकून मोलकरीण त्याच्या पायां पडली, व तिनें सर्व प्रकार त्यास सांगून त्याची क्षमा मागितली.

---

## शत्रुनाशाचा उत्तम उपाय.

कोणे एके वेळीं चीन देशामध्यें एक मोठें बंड झालें, आणि तेणेंकरून बादशाहास फार त्रास होऊं लागला. तेव्हां त्यानें आपले सगळे सरदार दरबारामध्यें बोलावून बंडवाल्यांवर स्वारी करण्याचा निश्चय केला. तो मोठ्या आवेशानें असें बोलला कीं, ' बंडखोर हे आमचे शत्रु आहेत, त्यांचा समूळ नाश केल्यावांचून परत यावयाचें नाहीं. ' नंतर बादशाहाचा क्रोध पाहून ते लोक भ्याले, आणि त्यास शरण आले. तेव्हां बादशाहानें त्यांच्या अपराधाची क्षमा केली; एवढेंच केवळ नव्हे, तर ते शुद्धीवर आले म्हणून त्यांस एक चांगली मेजवानी देण्याचा विचार ठरविला. तें पाहून त्याचा मुख्य प्रधान त्यास म्हणाला, ' महाराज, आपण दरबारामध्यें त्या दिवशीं बोललां काय आणि आज हें करतां काय ? शत्रूंचा समूळ नाश करावयाचा ना ? ' त्यावर थोडें हंसून बादशाहानें उत्तर दिलें, ' होय, शत्रूंचा समूळ नाश करावयाचा असें मीं म्हटलें होतें, तें मीं शब्दशः खरें केलें आहे. पहा, आतां हे लोक माझे शत्रु नाहींत, हे माझे मित्र झाले आहेत. त्यांचा मीं नाश केला तर, बोललों एक आणि केलें एक, असें होऊन मित्रघाताचें पातक माथीं येणार नाहीं काय ?' हें ऐकून तो मुख्य प्रधान निरुत्तर झाला. ( बालबोध. )

## रागाचा भयंकर परिणाम.

भवानराव पवार ह्या नांवाचा कोणीएक शेतकरी होता. त्याला शिकारीचा भारी नाद असे. त्याचा एक फार आवडता शिकारी कुत्रा होता. तो शिकारीचा पाठलाग करण्यांत व ती हुडकून काढण्यांत मोठा वस्ताद होता. आपला धनी शिकारीला निघाला कीं, तो आपला त्याच्यापुढें चालायाला लागलाच, असा नेहमींचा क्रम असे. असें असतां एके दिवशीं भवानराव सकाळीं उठून शिकारीला निघाला, तथापि कुत्रा त्याला कोठें दिसेना. तेव्हां त्यानें त्याला 'मोत्या! मोत्या!' म्हणून मोठ्यानें हांका मारिल्या, तरीही पण तो कोठेंच दिसला नाहीं. यावरून भवानराव तसाच चालता झाला.

भवानरावाची शेतवाडी जेथें होती तेथेंच तो रहात असे. तो शिकारीला गेल्यावर कांहीं वेळानें त्याची बायको व दहा बारा वर्षांचा एक मुलगा आणि गडी हीं नजीकच्या शेतांत कामास गेलीं. भवानरावाचें तान्हें मूल खाटेवर निजलें होतें. त्याला इतक्यांत कशाला उठवावें म्हणून त्याची बायको त्यास तेथेंच ठेवून गेली होती.

इकडे भवानरावाच्या बरोबर त्याचा आवडता कुत्रा नसल्यामुळें शिकारीकडे त्याचें मन लागेना, तेव्हां तो दोनतीन तासांतच परत आला. तो घराच्या फाटकाजवळ येतो तों त्याची बायको, मुलगा व गडी हीं अतिशय दुःख करीत असलेलीं त्याच्या दृष्टीस पडलीं. त्यानें बायकोस या गोष्टीचें कारण विचारिलें. तेव्हां तिनें मोठा हंबरडा फोडून म्हटलें, 'हाय! हाय! आज मोठा घात झाला! मूल निजलेलें होतें त्यास तेथेंच ठेवून आम्हांला शेतांत जाण्याची बुद्धि झाली, व अर्ध्या घटकेनें येऊन पाहतों तों मूल जाग्यावर नसून आपला मोत्या कुत्रा रक्तानें न्हालेला व कावराबावरा असा आमच्या दृष्टीस पडला. मला वाटतें कीं, त्यानेंच पोरास मारून

कोठें तरी नेऊन टाकिलें असावें. त्याच्याखेरीज दुसरे कोणाचें हें काम खचीत नसावें. असलें दुष्ट जनावर कशाला तरी घरांत बाळगिलें आहे ? येवढा वेळपर्यंत मेला येथें मारेकऱ्यासारखा धुंद होऊन इकडे तिकडे फिरत होता आतांच कोणीकडे काळें केलें कोण जाणे !' हें ऐकून भवानरावास किती वाईट वाटलें असेल हें सांगण्याची गरज नाहीं. त्याच्या बायकोप्रमाणेंच त्याचीही समजूत झाली कीं, मूल कुत्र्यानेंच खास मारिलें. मग तो मोठ्या आवेशानें म्हणतो, 'अरे निमकहरामा, घातकी जनावरा ! मीं आजपर्यंत तुजवर केलेल्या ममतेचें हें फळ तूं मला दिलेंस काय ? बरें, आतां तूं दृष्टीस पडल्यावर एकदम तुझ्या पोटांत तरवार खुपसून तुझा प्राण घेतों !' भवानरावाचा आवाज ऐकतांच कुत्रा जवळ कोठें होता तो धांवत धांवत व शेपटी हालवीत त्याजपाशीं आला. परंतु त्याच्या अगदीं जवळ न येतां एक गवताची गंज होती तिकडे जाऊं लागला, आणि धन्यास आपल्यामागें येण्याविषयीं खुणेनें सुचवूं लागला. परंतु भवानरावाचें भान संतापाच्या योगानें नाहींसें झालें होतें. त्यानें कुत्र्याच्या आंगावर जिकडे तिकडे रक्त उडालेलें पाहून, आपल्या मुलाचा प्राण घेणारें हें दुष्ट जनावर कशाला जिवंत ठेवावें असें म्हणून लागलींच आपल्या तरवारीच्या एका घावासरसें त्यास ठार केलें ! मरतांना कुत्र्यानें जी किंकाळी फोडिली ती ऐकून, भवानरावास जरी त्याचा संताप आला होता; तरी पराकाष्ठेचें वाईट वाटलें.

इतक्यांत वर सांगितलेल्या त्या गवताच्या गंजीकडून मुलाच्या रडण्याचा आवाज ऐकूं आला ! यावरून सर्व माणसें तेथें जाऊन पाहतात तों मूल चांगलें सुरक्षित असून, जसें एकाद्या मनुष्यानें त्यास आणून निजवावें तसें निजलेलें होतें ! हा प्रकार पाहून त्या सर्व माणसांच्या—विशेषतः आईबापांच्या—मनाला जो आनंद झाला

त्याचें वर्णन काय म्हणून करावें! परंतु थोडयाच वेळानें, ही सर्व गोष्ट कशी झाली असावी ह्याचा विचार भवानराव करीत असतां आपल्या हातून कुत्र्याच्या मरणासंबंधानें मोठें अविचाराचें काम झालें असावें असें त्यास वाटून त्याच्या मनाला मोठा धक्का बसला. नंतर मुलास घेऊन सर्व माणसें, त्यास ज्या खाटेवर निजविलें होतें, तिकडे गेलीं. तों त्या खाटेच्या पलीकडे एक भलें मोठें धूड त्यांच्या दृष्टीस पडलें. तें काय आहे म्हणून पहातात तों मारून टाकलेला लांडगा आहे असें त्यांना दिसून आलें. तेव्हां सर्व गोष्टीचा फाड पडला! तो असा कीं, लांडगा मुलाच्या लागावर घरांत शिरलेला असून त्यास कुत्र्यानें पाहिलें, व त्याला जी शिकार साधावयाची होती ती साधूं न देतां याचीच उलटी शिकार कुत्र्यानें केली, असें सहज त्यांच्या लक्ष्यांत आलें.

हें पाहून भवानरावाचें काळीज चूर्र झालें व बिचाऱ्या कुत्र्याचा उगीच प्राण घेतला याबद्दल त्यास पोटच्या पोराच्या मरणाप्रमाणें दुःख होऊन त्याच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या पुढें कित्येक दिवसपर्यंत, त्या कुत्र्याची मरणाच्या वेळची आरोळी जणूं काय आपल्याला एकसारखी ऐकूं येत आहे असें त्यास भासत असे, व तेणेंकरून त्याला फार दुःख होत असे!

यावरून, राग आला असतां त्याच्या आवेशांत एकदम एखादें कृत्य केलें तर प्रसंगविशेषीं तें कसें दुःखास व पश्चात्तापास कारण होतें तें सहज लक्षांत येईल.

---

## केकर पंथाच्या दोघां इंग्लिश गृहस्थांची गोष्ट.

ख्रिस्ती धर्माचे अनेक पंथ आहेत. त्यांत 'केकर' या नांवाचा एक पंथ आहे. या लोकांचें ब्रीद असें आहे कीं, कधीं कोणाशीं

लढाई करावयाची नाहीं, अथवा दुसऱ्यानें अपकार केला असतांहीं त्याचें उसनें न फेडतां उलटी त्याजवर दया करावयाची.

इंग्लंडचा दुसरा चार्लस याच्या कारकीर्दींत, लंडन व वेनिस या दोन शहरांमध्यें व्यापाराकरितां खेपा करणाऱ्या एका जहाजावर केकर पंथाचा कोणी गृहस्थ कप्तान होता; तसेंच त्या जहाजावरील सुकाणूंवालाही त्याच पंथाचा होता. परंतु बाकी चार खलाशी होते ते दुसऱ्या पंथाचे होते. वरील जहाज एकदां वेनिस शहराहून लंडनास येत असतां तुर्की चांचे लोकांनीं तें पकडिलें, व त्यावरील सर्व लोकांस कैद करून त्यांना गुलाम म्हणून विकण्याचा निश्चय केला. याप्रमाणें जहाज बळकावून ते चांचे लोक चालले असतां दुसरे दिवशीं रात्रीं पाऊस पडूं लागला, सबब चांचे लोकांचा कप्तान आपल्या कित्येक लोकांसह खालच्या मजल्यावर जाऊन निजला. तें पाहून त्याच्या बाकीच्या लोकांस तो केकर पंथाचा सुकाणूंवाला [ याचें नांव टामस लर्टिंग असें होतें. ] यानें सांगितलें कीं, ' तुम्हींही पावसांत भिजतां त्यापेक्षां खालीं खोल्यांत जाऊन निजाल तर बरें होईल. ' याप्रमाणें ते सर्व तुर्क लोक खालचे मजल्यावर गाढ झोंपीं गेल्यावर टामस यानें त्यांचीं सर्व हत्यारें गोळा करून घेतलीं; आणि आपल्या लोकांस म्हणाला, ' आतां हे तुर्क लोक आपल्या हातीं आले आहेत; तथापि यांना आपण इजा करावयाची नाहीं; मात्र यांना माजोर्का येथें आपण जाईपर्यंत वर येऊं द्यावयाचें नाहीं, म्हणजे झालें. ' माजोर्का हें बेट स्पेनच्या ताब्यांत होतें, सबब तेथें पोहोंचल्यावर आपणांस कांहीं भीति नसून पुढें इंग्लंडास जाण्यास अडचण पडणार नाहीं असें त्यास वाटलें.

उजाडल्यावर त्या तुर्क लोकांपैकीं एकजण उठून वरतीं जाऊं लागला, तेव्हां तो एकटाच असल्यामुळें त्यास कोणीं मनाई केली नाहीं. त्यानें पाहिलें तों जहाज पुनः इंग्लिश लोकांच्या ताब्यांत

गेलें असून माजोर्का बेटाच्या नजीक आलें आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. ह्यावरून त्यास मोठें नवल वाटलें व अतिशय भीति पडली. त्यानें हळूच खालीं जाऊन, आपल्या लोकांस त्यांच्या गाफीलपणाचा परिणाम काय झाला तो कळविला. तेव्हां त्या सर्वांची पांचांवर धारण बसली व ते रडावयास लागले. त्यांनीं इंग्लिश कप्तानास विनंती केली कीं, 'आतां आमच्यावर येवढा तरी उपकार करा कीं, आम्हांला स्पानिअर्ड लोकांस विकूं नका; कारण ते गुलामांस फार निर्दयपणें वागवितात, अशी प्रसिद्धी आहे. तेव्हां इंग्लिश कप्तान व सुकाणूंवाला ह्या दोघांनीं त्यांची खातरजमा करून त्यांस सांगितलें कीं, 'तुमच्या जिवास व स्वातंत्र्यास कोणतेही प्रकारें आमचेकडून धक्का पोहोंचणार नाहीं.' असें म्हणून त्यांनीं माजोर्का बेटाच्या बंदरीं तें जहाज पोहोंचेपर्यंत ते तुर्क लोक कोणाच्या दृष्टीस न पडतील अशी तजवीज केली. हा त्यांचा थोरपणा पाहून तुर्कांस विस्मय वाटला, व ते मनांत फार खजील झाले.

हें जहाज बंदरांत असतां दुसऱ्या एका इंग्लिश जहाजाचा कप्तान त्यावर आला. त्यास ह्या क्केकर पंथाच्या दोघां गृहस्थांनीं हा घडलेला सर्व वृत्तांत सांगितला, व त्या तुर्कांस गुलाम म्हणून मुळींच न विकतां आफ्रिकेच्या किनाऱ्याच्या एखाद्या भागावर सोडून देण्याचा आपला मानस कळविला. तेव्हां तो आलेला कप्तान म्हणाला, 'हें तुम्हीं भलतेंच काय मनांत आणिलें आहे? अहो, या मनुष्यांबद्दल तुम्हांला दोनदोनशें मोहरा मिळतील, त्या तुम्हीं गमावून बसणार हा कांहीं ठीक विचार नाहीं!' त्यांनीं उत्तर केलें कीं, 'छी! छी! आमच्याकडून असें कदापि होणार नाहीं. आम्हांस कोणीं हें सारें बेट बक्षीस दिलें तरी देखील आम्ही असलें कृत्य करणार नाहीं!' हें ऐकून तो कप्तान जहाजावरून निघून गेला. त्यानें, मी ही गोष्ट फोडणार नाहीं असें जरी वचन दिलें होतें, तरी

तें मोडून, स्पानिअर्ड लोकांस ती सर्व हकीकत सांगितली. तेव्हां त्यांनीं तुर्क लोकांस पकडण्याकरितां त्या जहाजावर हल्ला करण्याचा निश्चय केला. हें जहाजावरच्या केकर पंथाच्या दोघां गृहस्थांस, म्हणजे कप्तानास व सुकाणूवाल्यास कळतांच, त्यांनीं लागलेंच तेथून जहाज हांकारलें, व आपल्या बंदीवानांच्या मदतीनें त्या पाठलाग करणाऱ्यांच्या हातून ते सुटून गेले. ते नऊ दिवसपर्यंत भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें चालले होते, तरी बंदीवानांस सुरक्षित रीतीनें सोडण्यासारखें ठिकाण त्यांस सांपडलें नाहीं. तथापि कांहीं झालें तरी या तुर्कांस ख्रिस्ती लोकांच्या देशांत सोडावयाचें नाहीं असा जो त्यांचा निर्धार होता तो कायम होता. मध्यंतरीं एके वेळीं त्या कृतघ्न तुर्कांनीं कांहीं युक्ति करून जहाज आपल्या ताब्यांत घेण्याचा यत्न केला; पण कप्तान व सुकाणूवाला यांनीं त्यांची पक्की खोड जिरवून त्यांस चांगलें बंदोबस्तांत ठेविलें. तेव्हां बाकीचे चार खलाशी या दोघांच्या विरुद्ध कुरकुर करूं लागले कीं, हा तुमचा सात्विकपणा आम्हांस एखादे वेळेस भोंवणार, व तुर्कांच्या हातीं आम्ही पडून गुलाम होऊन जाणार असें दिसतें! तथापि त्या दोघांनीं कांहीं एक न ऐकतां तें गलबत तसेंच चालविलें. पुढें आणखी एकदां तें गलबत दुसऱ्या तुर्क चांचे लोकांच्या हातीं लागण्याचा प्रसंग आला असतां त्या वेळींही ह्या दोघांनीं रक्तस्राव बिलकूल न होऊं देतां त्या चांच्यांस वाटेस लाविलें. शेवटीं तें गलबत बार्बरी देशाच्या किनाऱ्यास गेलें तेव्हां येथें या तुर्कांस उतरावयास हरकत नाहीं असें त्यांस दिसून आलें. पण यांस कसें उतरावें हा त्यांना विचार पडला. यांना होडी देऊन तींत पाठवावें, तर न जाणों, कदाचित् त्याच होडींत हे हत्यारबंद होऊन परत येतील, आणि आपल्या गलबतावर हल्ला करतील; जर यांच्याबरोबर कांहीं खलाशी देऊन यांस किनाऱ्यावर पाठवावें, तर खलाशांवर उलटून पडून त्यांना कदाचित्

समुद्रांत लोटून देतील. बरें, यांच्या दोन टोळ्या करून पाठवाव्या, तर पहिली टोळी जाऊन तेथील इतर लोकांस हें वर्तमान कळवील, व ते तयार होऊन दुसरी टोळी किनाऱ्यास जाते तों होडीवर हल्ला करतील; अशी चोहोंकडून अडचण येऊन पडली. शेवटीं लर्टिंग ह्यानें सर्व तुर्क लोकांस एकदमच किनाऱ्यावर निर्भयपणें उतरण्याचें स्वतः पतकरलें. याप्रमाणें ते किनाऱ्यावर पोहोंचल्यावर त्यांनीं इंग्लिश लोकांचे फार आभार मानले, व येथें जवळच्या गांवांत आमच्याबरोबर आपण येण्याची मेहेरबानी कराल तर यथाशक्ति आम्हीं आपला पाहुणचार करूं असें कृतज्ञतापूर्वक ते म्हणाले. पण इंग्लिश लोकांनीं दूरवर विचार करून ती गोष्ट नाकारिली.

पुढें लवकरच चांगला वारा लागून तें जहाज इंग्लंडास पोहोंचलें. त्यापूर्वीं ही कप्तानाची व सुकाणूवाल्यांची गोष्ट जिकडे तिकडे प्रसिद्ध होऊन त्यांची मोठी वाखाणणी चालली होती. इतक्यांत जहाज ग्रीनिच बंदरीं येऊन पोहोंचल्याची बातमी आली. तेव्हां खुद्द राजा व त्याचा भाऊ डयूक ऑफ यॉर्क ( जो दुसरा जेम्स राजा या नांवानें पुढें प्रसिद्ध झाला ), आणि कित्येक मानकरी लोक, या अनुपम उदार अंतःकरणाच्या लोकांस भेटून त्यांचा गौरव करण्याकरितां बंदरावर आले. तथापि राजानें टामस लर्टिंग यास म्हटलें, 'तुम्हीं त्या तुर्क लोकांस मजकडे घेऊन आलां असतां तर बरें होतें.' तेव्हां त्यानें शांतपणें उत्तर केलें कीं, 'मला त्यांस त्याच ठिकाणीं सोडून देणें बरें वाटलें म्हणून मीं तसें केलें नाहीं!'

## युबर्टो याची गोष्ट.

भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावर जिनोआ नांवाचें एक शहर पूर्वीं व्यापारासंबंधानें फार प्रसिद्ध होतें. तेथील राज्यव्यवस्था बहुधा नेहमीं बडे लोकांच्या हातीं असे. परंतु एके प्रसंगीं ती त्यांचे हातून जाऊन

सामान्य लोकांनीं निवडलेल्या लोकांकडे गेली. या लोकनियुक्त मंडळीचा मुख्य युबर्टो ह्या नांवाचा कोणी व्यापारी होता. तो मूळचा गरीब असून आपल्या शहाणपणाच्या व उद्योगाच्या योगानें मोठ्या योग्यतेस चढलेला होता.

असो. शेवटीं बडे लोकांनीं जेव्हां मोठा भगीरथ प्रयत्न करून या नवीन सत्ताधारी मंडळीचा पाडाव केला व त्यांच्या हातून राज्याधिकार हिसकावून घेतला, तेव्हां पुनः त्या मंडळीकडून अशी खटपट कधींहि होऊ नये म्हणून त्यांनीं कडक उपाय योजिले. त्यांनीं युबर्टो याजवर राजद्रोहाची तोहमत आणून त्यास कैद केलें आणि त्याला जिनोआ येथून हद्दपार करण्याची शिक्षा देऊन, त्याची सर्व मालमत्ता जप्त केली व ती सरकारांत घेतली. त्याला शिक्षा सांगण्याकरितां अडोर्नो या नांवाच्या ज्या नवीन नेमलेल्या मुख्य माजिस्ट्रेटापुढें आणिलें होतें, तो खानदानीचा गृहस्थ असून उदार मनाचा होता; तथापि त्याला हा नवीन अधिकार मिळाल्यामुळें मोठा गर्व झाला, व खेरीज नुकत्याच झालेल्या बंडाळीमुळें तो पराकाष्ठेचा खवळून गेलेला होता. तेव्हां युबर्टो ह्यास उद्देशून तो मोठ्या धिक्कारानें त्यास म्हणाला, ‘ अरे भिकार व नीच मनुष्या ! जिनोआच्या थोर लोकांस पायाखालीं तुडवून टाकण्याचा यत्न करण्याचें तूं साहस केलेंस या तुझ्या अपराधास भारी शासन पाहिजे होतें; तथापि ज्यांचा तूं येवढा अपराध केलास, त्यांनीं तुजवर दया करून तुला फक्त तुझ्या मूळ स्थितीस पोहोंचविण्याचीच तेवढी शिक्षा दिली आहे ! ’ युबर्टो यानें न गडबडतां झालेली शिक्षा शांतपणें ऐकून घेतली. परंतु तो अडोर्नो यास म्हणाला कीं, ‘माजिस्ट्रेट साहेब, तुम्हीं मजवर जो हा येवढा वाग्बाणांचा वर्षाव केला, त्याबद्दल न जाणों, कदाचित् तुम्हांस पश्चात्ताप करण्याचा एखादे वेळीं प्रसंग येईल बरें ! ’ नंतर तो नेपल्स येथें गेला. तेव्हां त्या ठिकाणीं, ज्याकडे त्याचें कर्ज होतें असे कांहीं

व्यापारी त्यास भेटले. त्यांनीं इमानाला जागून आपलेकडचा त्याचा पैसा ताबडतोब त्यास दिला. ही जी काय थोडीशी रक्कम जमली, ती घेऊन युबर्टो हा आर्किपेलेगो मधील एका बेटांत जाऊन राहिला. या ठिकाणीं त्यानें व्यापार आरंभिला, व थोडक्याच काळांत आपल्या सचोटीनें, शहाणपणानें व उद्योगानें पुष्कळ द्रव्य संपादन केलें.

युबर्टो हा कधीं कधीं कामकाजाच्या संबंधानें टयूनिस नामक शहरीं जात असे त्या शहरच्या लोकांचें इतालींतील बहुतेक संस्थानांशीं, व विशेषतः जिनोआसंस्थानांशीं, फार वैमनस्य होतें; परंतु वेनिस संस्थानाशीं त्यांचा स्नेहभाव होता, व युबर्टो हा ज्या बेटांत जाऊन राहिला होता म्हणून वर सांगितलें, तें बेट वेनिसच्या ताब्यांत होतें. टयूनिस येथील लोक मुसलमान होते, व लढाईंत अगर अन्य रीतीनें आपल्या हातीं सांपडलेल्या सर्व ख्रिस्ती लोकांस ते गुलाम करीत असत. एके प्रसंगीं युबर्टो हा तेथील कोणा श्रीमान् गृहस्थाची बाग पहावयास गेला असतां, एक लहानसा ख्रिस्ती गुलाम, पायांत बेड्या असलेला असा त्या बागेंत खणण्याचें काम करतांना त्याच्या दृष्टीस पडला. त्याला पाहून युबर्टो यास फार वाईट वाटलें. तो मुलगा अंगानें सडपातळ असून त्याला तें काम करतांना फार कष्ट होतात असें युबर्टो यास दिसलें. तो कुदळीचे घाव घालीत असतां मधूनमधून तिला टेकीत असे, व त्याच्या तोंडांतून दुःखाचे सुस्कारे निघत असत, आणि डोळ्यांतून अश्रू गळत असत. युबर्टो यानें त्याला इतालियन भाषेंत, तूं कोण, कोठला वगैरे विचारिलें असतां जिनोआ येथील मुख्य माजिस्ट्रेटाचा मी मुलगा असें त्यानें सांगितलें. तें ऐकून युबर्टो हा चकित झाला, पण त्या वेळीं जास्त कांहीं एक न बोलतां लागलाच तो तेथून निघून गेला.

ज्या कप्तानाच्या हातीं हा मुलगा लागलेला होता त्याचा युबर्टो यानें ताबडतोब शोध लाविला व त्याजकडे जाऊन त्यानें त्यास विचा-

रलें कीं, ' अमुक अमुक गुलामाबद्दल तुम्ही काय खंड घेणार?' तो म्हणाला, ' तो मुलगा मातबर मनुष्याचा असावा असें मला वाटत आहे. याकरितां मीं त्याजबद्दल पांच हजार रुपयांहून कमी रक्कम घेणार नाहीं. युबर्टो यानें लागलींच ती रक्कम त्यास आणून दिली व एक नोकराचे हातीं चांगला पोषाख देऊन तो त्यासह त्या काम करीत असलेल्या गुलामाकडे परत आला; आणि तूं बंधमुक्त झाला आहेस असें त्यानें त्यास सांगितलें. त्यानें त्याच्या बिड्या काढून टाकण्यास स्वतः मदत केली, व आपल्या हातांनीं नवा आणलेला पोषाख त्यास चढविला. तो मुलगा हा सर्व प्रकार पाहून अगदीं भांबावून गेला, व हें स्वप्न तर नाहींना असें त्यास वाटलें. पण युबर्टो यानें लागलींच त्यास आपल्या बिऱ्हाडीं नेलें, व त्याच्याशीं पुष्कळ ममतेच्या गोष्टी बोलून, त्यास भोगावयास लागलेल्या दुःखाबद्दल पराकाष्ठेची दिलगिरी दाखविली, तेव्हां त्याची खात्री झाली कीं, या गृहस्थानें उदार बुद्धीनें आपणांस मुक्त केलें यांत संशय नाहीं !

असो; पुढें लवकरच युबर्टो यानें अडोर्नोच्या मुलास आपल्या पदरची वाटखर्ची देऊन जिनोआ येथें रवाना करण्याची तजवीज केली. तो अडोर्नोच्या मुलास म्हणाला, ' मुला, मीं मोठ्या आनंदानें आणखी कांहीं दिवस तुला आपल्या घरीं ठेऊन घेतलें असतें, परंतु तुला आपल्या आईबापांस भेटण्याची फार उत्कंठा लागली असेल याकरितां तसें मी करीत नाहीं. घरीं गेल्यावर तूं आपल्या बापास, हें पत्र मी देतों तेवढें प्रविष्ट कर म्हणजे झालें. तुझा मला लवकर विसर पडणार नाहीं, व त्याचप्रमाणें माझाही तुला न पडेल अशी मला उमेद आहे. ' त्या मुलानें युबर्टो ह्याच्या ह्या अनुपम औदार्याबद्दल त्याचे फार फार आभार मानले, व तो आनंदाश्रु

ढाळीत त्याचा निरोप घेऊन जिनोआस जाण्याकरितां गलबतांत बसला, आणि लवकरच तेथें सुखरूप पोहोंचला.

आतां अडोर्नो ह्याचा हा मुलगा गुलाम म्हणून कसा विकला गेला तें सांगतों. तो आपल्या बापाच्या सांगण्यावरून जहाजांत बसून कांहीं कामाकरितां एका बंदरीं जावयास निघाला होता, व तें जहाज ट्यूनिस येथील लोकांनीं पकडून त्यांतील लोकांस गुलाम करून टाकिलें, तेव्हां त्या सर्वांबरोबर ह्या मुलाचीही तीच वाट लागली. मग त्या जहाजाचा जेव्हां पुष्कळ दिवस ठिकाण लागेना, तेव्हां या मुलाच्या आईबापांस वाटलें कीं, जहाज वादळांत सांपडून समुद्रांत बुडालें असावें, व त्यांत आपला मुलगा मरण पावला असावा. पण वर सांगितल्याप्रमाणें एकाएकीं तो सुखरूप आलेला जेव्हां त्यांच्या नजरेस पडला, तेव्हां त्याच्या आनंदास पारावार नाहींसा झाला, व कांहीं वेळ त्यांच्या तोंडांतून शब्दही निघेना! नंतर थोड्या वेळानें, झालेली सर्व हकीकत जेव्हां मुलानें अडोर्नो ह्यास सांगितली तेव्हां तो म्हणाला, ‘ अशा प्रकारें तुझी सुटका करून आम्हांवर जन्मजन्मांतरीं न फिटण्यासारखे उपकार करणारा हा मनुष्य तरी कोण ? ’ तेव्हां मुलगा म्हणतो, ‘ तो कोण, कोठला हें सर्व ह्या पत्रावरून तुम्हांला कळेल. ’ असें म्हणून त्यानें युबर्टो ह्याचें पत्र त्याच्या हातीं दिलें. तें त्यानें फोडून पाहिलें तों त्यांत पुढील मजकूर होता:—

‘ **अडोर्नोसाहेब,**

‘ जिनोआ येथील भिकार व नीच मनुष्य, ज्यानें तुम्हांस म्हटलें होतें कीं, तुम्हीं मजवर हा जो एवढा वाग्बाणांचा वर्षाव केला; त्याबद्दल तुम्हांस न जाणों कदाचित् पश्चात्ताप करण्याचा एकादे वेळीं प्रसंग येईल, त्याच भिकार व नीच मनुष्यास आपलें भविष्य खरें

ठरल्याबद्दल मोठा संतोष वाटत आहे! अरे गर्विष्ठ मनुष्या! ज्यानें तुझ्या एकुलत्याएक मुलास दास्यापासून मुक्त केलें तोच मी—

हद्दपार केलेला युबर्टो.'

पत्र वाचून अडोर्नो यानें तें खालीं टाकिलें; व तोंडावर हात ठेवून तो खालीं मान घालून बसला; आणि इकडे याच्या मुलानें युबर्टो याच्या औदार्याची व आपल्यावर पुत्राप्रमाणें केलेल्या प्रेमाची एकसारखी वाखाणणी चालविली. तेव्हां आतां युबर्टो याचे उपकार कसे फेडावे याविषयीं अडोर्नोला मोठा विचार पडला. मग त्यानें, युबर्टो यास हद्दपार करण्याची जी शिक्षा झालेली होती ती फिरविण्याविषयीं जिनोआ येथील बडे लोकांस विनंती केली. तेव्हां युबर्टो याच्यासंबंधानें जो त्यांचा वाईट ग्रह झालेला होता तो कालावधीमुळें हल्लीं बहुतेक नाहींसा झाला असल्याकारणानें; त्यांनीं अडोर्नो याची विनंती मान्य करून त्याला जिनोआ येथें परत येण्यास परवानगी दिली. तें परवानगीचें पत्र युबर्टो यास अडोर्नो यानें स्वतः लिहून त्यांत याच्या थोरपणाबद्दल व उपकारांबद्दल त्याची फार स्तुति केली, आणि तुम्हीं माझ्याशीं यापुढें निरंतर स्नेह ठेवावा अशी त्यास विनंती केली, नंतर लवकरच युबर्टो हा जिनोआ येथें परत आला; व तेथें बहुत वर्षेपर्यंत संपत्ति व कीर्ति या ऐश्वर्यानें युक्त होऊन मोठ्या सुखानें राहिला.

## फिलिप्पा राणीची गोष्ट.

इंग्लंडचा राजा तिसरा एडवर्ड याचे वेळीं इंग्लंड व फ्रान्स या देशांमध्यें लढाई चालली होती. त्यावेळीं एडवर्ड राजानें फ्रान्सांतील क्याले नामक शहरास सुमारें वर्ष सवा वर्ष वेढा घातला होता. तथापि तें शहर त्याच्या हस्तगत न होतां त्याचे सैन्यांतील पुष्कळ लोक मरून त्याचा नाश मात्र झाला. यामुळें त्या शहरच्या लोकांवर ते

एकसारखा दांतओंठ खात होता. पुढें शहरांतील लोकांस अन्नपाण्याचा तोटा पडून त्यांजवर जेव्हां मरणाची पाळी आली, तेव्हां शहर राजाच्या स्वाधीन करण्यास ते तयार झाले. त्या वेळीं त्यानें त्यांस कळविलें कीं, ' तुम्ही आपल्या जिवाच्या व मालमत्तेच्या संबंधानें कोणत्याही प्रकारची अट न ठेवितां जर शहर माझ्या स्वाधीन कराल, तरच ती गोष्ट मला कबूल आहे. ' परंतु अशा प्रकारचें राजाचें कडक वर्तन खुद्द त्याच्या सरदारासही पसंत पडलें नाहीं. ह्यावरून त्यानें पुढीलप्रमाणें आपल्या अटींत फेरबदल केला. त्यानें असें ठरविलें कीं; ' शहरच्या मुख्य लोकांपैकीं सहा असामी उघडे बोडके, अनवाणी, फक्त अंगांत कमीज घालून, आणि गळ्याभोंवतीं फांशीं देण्याची दोरी अडकवून माझ्यासमोर येतील, व किल्ल्याच्या आणि शहराच्या दरवाजाच्या किल्ल्या माझ्या स्वाधीन करतील, आणि या सहाजणांस मी वाटेल ती शिक्षा करीन—त्यांचा शिरच्छेद करीन—ती गोष्ट ते मान्य करतील, तर बाकीच्या लोकांस मी जिवदान देईन. ' हें एडवर्ड राजाचें म्हणणें शहरच्या लोकांस कळल्यावर तेथें मोठा आकांत झाला; कां कीं, याप्रमाणें आपल्या जिवावर उदार होणारे सहा असामी मिळण्याची पराकाष्ठेची पंचाईत दिसली. नंतर बराच वेळ विचार झाल्यावर तेथला सर्वांत वजनदार असा एक गृहस्थ, यूस्टेस डी सेंट पीरी या नांवाचा होता, तो पुढें होऊन मोठ्या आवेशानें लोकांस उद्देशून म्हणाला, ' या बिकट प्रसंगीं जो कोणी या सुंदर शहराच्या बचावाकरितां आपला जीव देण्यास तयार होईल, त्याचें तें कृत्य ईश्वरास रुजू होऊन या देशावर त्याचे मोठे उपकार होतील. मी हें केवळ तोंडानें नुस्तें बोलतों असें नाहीं, तर क्याले शहरच्या बचावासाठीं खंडणीचा भाग म्हणून मी आपलें स्वतःचें शिर इंग्लंडच्या राजास अर्पण करण्यास तयार आहें ! ' हें त्या गृहस्थाचें बोलणें

ऐकून सर्व लोकांस पराकाष्ठेचा गहिंवर आला, व स्वदेशाविषयीं त्याची ही निःसीम निष्ठा पाहून त्यांच्या नेत्रांतून टप टप अश्रु गळाले! यूस्टेस यांचें हें अपूर्व वर्तन पाहून; दुसरे आणखी पांच असामी त्याच्याप्रमाणें जिवावर उदार होऊन क्याले शहराकरितां जें कांहीं नशिबीं येईल तें भोगण्यास लागलेच तयार झाले. नंतर त्या सहा असामींनीं एडवर्ड राजाच्या हुकुमाप्रमाणें पोषाख वगैरे केले. तें खरोखर मनास अत्यंत खेद वाटण्यासारखे होते, तथापि सार्वभौम राजाच्या दरबारीं सन्मानाचे झगे मिळण्यापेक्षांहि त्या प्रसंगीं त्यांची योग्यता अधिक होती! असो, ते लोक राजापुढें आल्यावर राजानें धिःक्कारयुक्त मुद्रेनें त्यांजकडे पाहिलें व तुम्ही हटवादीपणा करून माझें विनाकरण नुकसान केलें वगैरे शेंकडों प्रकारांनीं त्यास टोंचून बोलून त्यानें त्यांची अतिशय निर्भर्त्सना केली; आणि लागलींच त्यांस फांशी चढविण्याचा हुकूम केला. त्यावेळीं राजाच्या पदरच्या मोठमोठ्या सरदारांनीं, व प्रत्यक्ष युवराज, प्रिन्स ऑफ वेल्स, यानेंहि, या लोकांस जीवदान द्यावें म्हणून राजापाशीं फार रदबदली केली, परंतु तो मुळीं कोणाचेंहि ऐकेना!

शेवटीं एडवर्ड राजाची राणी फिलिप्पा हिला त्या लोकांचीं फार दया आली, व त्यांचा जीव बचावण्याकरितां होईल तितकी खटपट करण्याचा तिनें निश्चय केला. ती नुकतीच इंग्लंडाहून राजाच्या छावणींत आलेली होती, व ती मोठी दैवशाली अशी ख्याती झालेली होती; कां कीं, तिच्या हातीं कांहीं वेळ राज्य-कारभाराचें काम असतां इंग्लंडास कित्येक मोठमोठे जय मिळाले होते. खेरीज यावेळीं ती गरोदरही होती. या सर्व कारणांमुळें तिच्या शब्दास राजाकडून मान मिळालाच पाहिजे असा प्रकार होता. असो. मग जेव्हां आपल्या मध्यस्थीवांचून राजाचें अंतःकर-णास द्रव येत नाहीं असें तिला दिसलें, तेव्हां ती झटकन् आपल्या

जाग्यावरून उठली, आणि राजापुढें गुडघे टेंकून व डोळ्यांस पाणी आणून अत्यंत नम्रतापूर्वक म्हणाली, ' महाराज, आपल्या चरण-दर्शनाकरितां मी येवढा समुद्राचा प्रवास करून हाल सोशीत येथें आलें आहे, त्या अर्थीं माझी एक गोष्ट आपण मान्य करणार नाहीं काय ? माझें येवढेंच मागणें आहे कीं, मजकडे लक्ष देऊन तरी आपण या दुर्दैवी लोकांवर दया करावी. असें केलें असतां आपला थोरपणा या जगतीतलावर गाजून परमेश्वर आपलें कल्याण करील ! '

एडवर्ड राजानें अंमळ विचार केला, व राणीच्या तोंडाकडे पहात तो क्षणभर स्तब्ध राहिला. मग शेवटीं तो म्हणाला, ' प्रिये ! काय सांगूं ? आजच्या प्रसंगीं तूं येथें नसतीस तर फार चांगलें झालें असतें ! असो, पण जो योग घडून येणार तो चुकतो कसचा ! व मी तुझें म्हणणें नाकबूल तरी कसें करूं ? घे तर आतां या सहा लोकांस तूं आपल्या ताब्यांत, आणि वाटेल तशी यांची व्यवस्था कर ! '

त्या दयाळू राणीस या गोष्टीचा मोठा हर्ष वाटला. तिनें तत्क्षणींच त्या बंदिवानांचे ते अपमानकारक पोषाख काढवून त्यांस नवे चांगले घालावयास दिले, आणि त्या प्रत्येकास कांहीं बक्षीस देऊन मोठ्या आनंदानें त्यांची सुटका केली. हा प्रकार पाहून क्याले शहरच्या सर्व लोकांनीं व इंग्लिश सैन्यांतील लोकांनींही राणीच्या ह्या परोपकाराच्या व दयेच्या कृत्याबद्दल तिची फार स्तुति केली.

## भिण्याचें कारण नाहीं.

श्लोक.

करुनि मीपण तें सगळें कमी
वस निरंतर संतसमागमीं

गणे तुझें घर ही अवघी मेही
  मग न भीं त्रिजगांत कुणासही ! १
वचन शास्त्रसुसंमतें तें वदें
  स्वरसने अपशब्द करूं न दे
नयपथीं पुढतीं सर निश्चयीं
  मग न भीं त्रिजगांत कुणासही ! २
परधनावर दृष्टि न ठेवणें
  परहितास्तव संतत कष्टणें
परजना स्वजनासम मानणें
  मग नको त्रिजगांत कुणा भिणें ! ३
जन असो स्वगुणें बहु दांडगा
  निपट धट्ट खरोखर लांडगा
कर तयावरती उपकार हा
  मग विशंक तयाविषयीं रहा ! ४
उपकृती करि बुद्ध जना जशी
  इतर शक्ति दुजी न कधीं तशी
म्हणुनि ती करणें हित हें खरें
  मग भिणें सहजें सगळें सरे ! ५
सुकृति हे वश सर्व जना करी
  भय समूळ खरोखर संहरी
म्हणुनि ती करणें दृढनिश्चयें
  इहपरीं सुख यांत करास ये ! ६

---

१ मान, समज. २ पृथ्वी. ३ शास्त्रास पूर्ण मान्य. ४ आपल्या जिभेला. ५ न्यायाच्या मार्गांत. ६ या लोकीं व परलोकीं.

# मनाचा थोरपणा.



या जगांत कित्येक लोक हलक्या मनाचे असतात. ते दुसऱ्याचे क्षुल्लक देखील दोष बाहेर काढण्याला सदोदीत टपलेले असतात. तसेंच दुसऱ्याकडून बुद्धिपुरस्सर नव्हे, तर सहजगतीनें त्यांना इतकीशी इजा झाली असतां ते त्याजवर मोठा त्रागा करतात, व आणखी त्याजवर त्याबद्दल डाव धरून, प्रसंग आला असतां त्याचा सूड घेण्यास सोडीत नाहींत. ते आपल्या धंद्याच्या प्रत्येक मनुष्याचा हेवा करतात, व कोणाची दैवयोगानें भरभराट झाली असतां त्यांच्या अंगाचा तिळपापड होतो!

थोर मनाचे जे लोक असतात त्यांचें ह्याच्या अगदीं उलट असतें क्षुल्लक अपकार तर ते मुळींच मनांवर घेत नाहींत. तसेंच त्यांना लवकर राग येत नाहीं, व आला तर तो फारच थोडा वेळ टिकतो. आपल्या पेशाच्या कोणा मनुष्याची बढती झाली असतां त्यांना मोठा आनंद होतो–मग त्यांची स्वतःची बढती झाली नसली तरी ते फिकीर करीत नाहींत. दुसऱ्यानें अमुक पराक्रम केला, तर आपणही झटून मेहनत करून तसा पराक्रम करूं अशी ईर्ष्या ते बाळगतात–पण ती दुसऱ्याच्या द्वेषबुद्धीनें मात्र नव्हे. दुसऱ्याकडून चुकून कांहीं अपराध घडला असून त्यापासून त्यांना मोठा ताप झाला तरी ते त्याविषयीं यत्किंचित्‌ही त्रास मानीत नाहींत. ते आपलें एकादें काम साधण्याकरितां लबाडीलचाडी अथवा कपट करीत नाहींत; व आपले स्वतःचे दोष कबूल करण्यास कधींही मागेंपुढें पहात नाहींत. मनाची समता व परोपकाररतता हें त्यांचें केवळ ब्रीदच असतें. अशी मनाची थोरवी जगांत फार क्वचित्‌ आढळते, व ती ज्यांच्या ठायीं वास करते, ते पुरुष धन्य होत.

## मासिडोनियाचा राजा फिलिप याची गोष्ट.

महाप्रख्यात शिकंदर बादशाहा याचा बाप फिलिप याचें व अथेन्सच्या लोकांचें वांकडें होतें. तेथील मोठमोठ्या वक्त्यांनीं फिलिप याजबद्दल खोट्यानाट्या गोष्टी लोकांस सांगून त्यांचीं मनें त्याजविषयीं दूषित करण्याचा क्रम चालविला. ही गोष्ट फिलिप याच्या दरबारी लोकांनीं त्याच्या कानावर घातली असतां तो थोर पुरुष म्हणाला, ' मला याबद्दल कांहींएक तजवीज करण्याचें कारण नाहीं. ते ज्या गोष्टी माझ्या विरुद्ध लोकांच्या मनांत भरवून देत आहेत, त्या निवळ खोट्या हें मी आपल्या स्वतःच्या कृतीनें जगास दाखवीन म्हणजे झालें ! '

याचप्रमाणें त्याच्या एका नोकरानें एकदां त्याची कांहीं निंदा केली असतां, त्याला नोकरीवरून काढून टाका असें जवळच्या लोकांनीं त्यास सांगितलें. तेव्हां तो म्हणाला, ' थांबा, माझ्या हातून त्याला वाईट वाटण्यासारखें कांहीं घडलें आहे कीं काय तें प्रथम पाहिलें पाहिजे. ' पुढें चौकशी करतां खरोखरीच त्याला असें आढळून आलें कीं, त्या नोकरानें आपली कांहीं मोठी कामगिरी बजावली असून त्याला तिजबद्दल आपल्या हातून कांहींच मिळालें नाहीं ! तेव्हां राजानें आपली चूक लक्षांत आणिली, व त्या मनुष्यास लोकांच्या सांगण्याप्रमाणें शिक्षा न करितां ताबडतोब मोठें इनाम दिलें !

## शिवाजी राजा, त्याचे सोबती व एक ब्राह्मण.

शिवाजी दिल्लीस औरंगजेबाच्या भेटीस गेला असतां त्यास त्यानें दग्यानें कैद केलें; परंतु तो युक्तीनें निघून दक्षिणेंत आला,

ही हकीकत सर्वप्रसिद्धच आहे. पण मध्यंतरीं एक चमत्कारिक गोष्ट घडली, ती अशी. *

शिवाजी दिल्लीहून निघाला त्या वेळीं त्याजबरोबर त्याचा मुलगा संभाजी व त्याच्या जिवास जीव देणारे त्याचे परम मित्र येसाजी कंक व तानाजी मालुसरा हे होते. हे चौघेही गोसाव्यांच्या वेषानें येत होते. तथापि औरंगजेबानें, शिवाजीस जो पकडून देईल त्यास दोन हजार होन बक्षीस मिळतील अशी दवंडी पिटविली असल्यामुळें, मुलूखभर त्याच्या शोधावर लोक होते. यामुळें शिवाजीस वाटलें कीं, आपण चौघे एकदम चाललों असतां घात होण्याचा संभव आहे, म्हणून त्यानें तानाजी व येसाजी यांस सांगितलें कीं, ' मी निराळा मागून येतों. मग आपण सर्वजण दक्षिणेंत सुखरूप पोहोंचलों तर बरेंच, नाहींपेक्षां कदाचित् माझें जरी कांहीं बरेंवाईट झालें तरी हरकत नाहीं, तुम्ही संभाजीस गादीवर बसवून माझे हेतु शेवटास न्या म्हणजे झालें. '

परंतु ही गोष्ट शिवाजीचे सोबत्यांस रुचली नाहीं. यास्तव ते सर्वजण एकत्रच निघून चालले. पण पुढें असें झालें कीं, ते मुर्शिदाबादेनजीक आल्यावर एका झाडींतून चालले असतां एक मोठा वाघ त्यांच्यावर चालून आला. शिवाजीनें आपल्या दोघां सोबत्यांस संभाजीला संभाळण्यास सांगून आपल्या सोट्यानिशीं वाघाचा समाचार घेण्याचा निश्चय केला. त्याचें धैर्य व शौर्य विलक्षणच ! वाघ अंगावर आल्याबरोबर त्यानें आपला सोटा इतक्या जोरानें त्यास मारिला कीं, तो व्याकुळ होऊन गेला ! परंतु पुनः दोनतीन वेळ अवसान धरून तो आणखी चाल करून आला. तेव्हां शिवाजी त्यास पहिल्याप्रमाणेंच रट्टा लगावीत असतां त्याच्या सोट्याचे दोन तुकडे

*ही गोष्ट ' सुधारक ' पत्रांतून संक्षेप करून घेतली आहे.

झाले ! त्यावरून वाघास फारच आवेश आला, व त्यानें जास्त अवसानानें शिवाजीवर उडी घातली. इतक्यांत तानाजी हा धांवत आला, व त्यानें वाघास आपल्या सोटयाचा असा एक रट्टा दिला कीं, तेणेंकरून तो भिऊन पळून गेला तो पुनः आला नाहीं ! परंतु वाघाचे शेवटचे उडीचे वेळीं त्याचा पंजा शिवाजीच्या डाव्या खांद्यास लागून त्यास भयंकर जखम झाली. तेव्हां तानाजीनें पाणी आणिलें, व येसाजीस जखमेवर कांहीं झाडपाल्याचें औषध माहीत होतें, तो झाडपाला आणण्याकरितां तो निघून गेला. सुदैवानें लवकरच तो पाला सांपडला. मग त्यांनीं ती जखम धुवून बांधिली.

नंतर हळूहळू ते मुर्शिदाबादेस गेले. तेथें जाऊन थोडा वेळ झाला नाहीं तों शिवाजीस सडकून ताप आला. तेव्हां सर्वजण अगदीं घाबरून गेले. काय करावें तें त्यांस सुचेना. उघड्या हवेंत राहून अशा प्रसंगीं भलतेंच व्हावयाचें. बरें, कोणाच्या घरीं बिऱ्हाड द्यावें, तर तें मिळण्याचीही पंचाईतच. बिऱ्हाडही मिळालें, पण कदाचित् आपल्या तोंडून एखादा शब्द चुकून बाहेर पडला, व आपण कोण हें येथें प्रसिद्ध झालें, तर प्राणाशीं गांठ पडणार, अशी त्यांना चोहोंकडून पंचाईत येऊन पडली. परंतु काय होईल तें होवो, बिऱ्हाड कोठें तरी पाहिलें पाहिजे असा त्यांचा शेवटीं निश्चय झाला. त्यांनीं पुष्कळांची विनवणी केली, परंतु जागा कोणीही देईना. शेवटीं विनायक देव या नांवाचा कोणी महाविद्वान् व दया-शील ब्राह्मण त्यांस भेटला. त्यानें आपल्या घरांत त्यांची सोय केली. हा ब्राह्मण मूळचा गृहस्थाश्रमी होता, परंतु त्याजवर कांहीं भयंकर प्रसंग आल्यामुळें त्यानें वैराग्य धारण केलें होतें, व कोरान्न मागून तो उपजीविका करीत असे. त्याच्या घरांत फक्त एक त्याची आई होती; तिची शुश्रूषा करण्यांत व होईल तितका परोपकार करण्यांत तो निमग्न असे.

असो, या ब्राह्मणाचे घरीं शिवाजीचे प्रकृतीस आराम पडूं लागला. पण प्रकृति साफ बरी होण्यास बराच अवधि लागेल, तेव्हां आपल्यामागें आपण उभारलेल्या राज्याचा पाया ढासळूं नये म्हणून शिवाजीनें तानाजी व येसाजी यांस सांगितलें कीं, ' तुम्हीं आतां येथें क्षणभरही न राहतां संभाजीस घेऊन दक्षिणेंत गेलेंच पाहिजे. ' हें त्याचें बोलणें ऐकून ते फार कष्टी झाले; कां कीं, शिवाजीस तशा स्थितींत टाकून जाणें त्यांच्या अगदीं जिवावर आलें. परंतु त्याची आज्ञा त्यांस शिरसावंद्य, सबब त्यांनीं ती गोष्ट मान्य केली. तथापि त्या दोघांनीं आपसांत अशी तोड काढिली कीं, येसाजीनें संभाजीस घेऊन जावें, व तानाजीनें मुर्शिदाबादेस, शिवाजीस नकळत, कारण पडल्यास त्याच्या साह्यास रहावें. मग त्यांनीं विनायक देवास सांगितलें कीं, ' आम्ही तिघे ( येसाजी, तानाजी व संभाजी ) कांहीं नवस फेडण्यासाठीं काशीस जाऊन येतों, तर तोंपर्यंत आमच्या ह्या भावास ( शिवाजीस ) कृपा करून संभाळा; ' असें म्हणून ते त्याच्या घराबाहेर पडले.

ब्राह्मण नित्य भिक्षा मागून आणून आपला, मातुश्रीचा व शिवाजीचा निर्वाह करीत असे. कांहीं दिवसांनीं शिवाजी बरा झाल्यावर एकदा ब्राह्मणास फार थोडी भिक्षा मिळाल्यामुळें, त्यानें अन्न शिजवून आईस व गोसाव्यास वाढिलें व आपण उपाशींच राहिला. ही गोष्ट शिवाजीच्या नजरेस आल्यावरून त्यास परम दुःख झालें! तो मनांत म्हणाला, ' ब्राह्मणांचा प्रतिपाल करणें हें माझें ब्रीद असतां मला खायाला घालून ब्राह्मणानें उपाशीं रहावें हें अनुचित होय! आजपर्यंत यानें मजकरितां असे किती उपास काढिले असतील कोण जाणे ? ' हे विचार मनांत येऊन तो फार कष्टी झाला. मग ह्या धन्य पुरुषाचें उतराई कसें व्हावें व याचें दारिद्र्य कसें दूर करावें हा विचार एकसारखा त्याच्या मनांत घोळूं लागला. पण या

गोष्टीची कांहींच तोड त्याला सुचेना. आपण यास दक्षिणेंत बरोबर घेऊन जावें, तर हा वृद्ध मातुश्रीसह येतो कसचा ? बरें आपण तेथें पोहोंचल्यावर यास द्रव्य पाठवून द्यावें, तर आपण संकटांतून निभावून दक्षिणेंत पोहचूं याचा नेम काय ? तेव्हां त्या थोर पुरुषास एक विलक्षण कल्पना सुचली. त्यानें त्या ब्राह्मणाकडून लिहिण्याचें साहित्य मागवून एक लखोटा लिहून*तयार केला. तो घेऊन तेथील सुभेदाराकडे जाण्यास त्यानें ब्राह्मणास सांगितलें. सुभेदाराच्या हातीं लखोटा गेल्यावर त्यानें तो फोडून पाहिला, तों त्यास पुढील मजकूर त्यांत आढळला. ' शिवाजी या ब्राह्मणाचे घरीं आहे. त्याच्याबरोबर या आणि त्यास खुशाल पकडा. माल जाहीर केलेलें दोन हजार होनांचें बक्षीस या ब्राह्मणास दिलें पाहिजे. ब्राम्हणास बक्षीस न देतां विश्वासघात करून जर शिवाजीस धरण्याचा यत्न कराल, तर मात्र पश्चात्ताप पावाल, ' अहाहा ! केवढी तरी या महात्म्याची थोरवी ! आतां हें पत्र लिहिण्यापूर्वीं एक गोष्ट त्याच्या मनांत आली. ती ही कीं, आपल्या मागें आपण आरंभिलेल्या कामाचें कसें होईल. पण लागलाच त्यानें विचार केला कीं, संभाजी सुरक्षित दक्षिणेंत पोहोंचला तर ठीकच आहे. पण तसें दुर्दैवानें नच झालें, तर देशाचें नष्टचर्य संपलें असल्यास दुसरा कोणी आपणासारखा किंवा आपल्याहूनही जास्त योग्यतेचा पुरुष निपजून तें कार्य तडीस नेईल.

असो, पत्र वाचतांच सुभेदारास विलक्षण आनंद झाला. त्याला असें वाटलें कीं, आपण शिवाजीस दिल्लीस नेऊन बादशहापुढें उभें केलें तर तो आपल्यावर खूष होऊन आपणास एकादा प्रांत बक्षीस

* शिवाजीस लिहितां येत नव्हतें असें म्हणतात; पण खात्रीलायक आधारावरून आतां असें समजतें कीं, त्यास थोडेंसें कामापुरतें लिहितां वाचतां येत होतें.

देईल. शिवाजीस त्यानें दिल्लीस पाहिलें होतें. सबब त्यास ओळखण्याची त्याला अडचण नव्हती. आतां ब्राह्मणास बक्षीस देण्याचें तें बादशाहाकडून द्यावयाचें, परंतु तें दिल्याखेरीज शिवाजीस पकडलें तर ब्राह्मण गवगवा करील, व शिवाजीस गुप्तपणें दिल्लीस नेण्याचा आपला हेतु साधणार नाहीं, असें त्यास वाटून त्यानें पदरचे दोन हजार होन घेतले व दहाबारा निवडक लोकांसह ब्राम्हणाचे घरीं आला. शिवाजीस त्यानें तत्काळ ओळखलें, आणि ब्राह्मणाचे पुढें होनांची थैली टाकून शिवाजीस पकडून घेऊन चालता झाला. तें पाहून ब्राम्हणाचे मनाची फार कष्टमय स्थिति झाली ! गोसाव्यानें चिटी दिली काय, आपण सुभेदाराकडे गेलों काय, व तो आपल्यापुढें थैली टाकून गोसाव्यास पकडून घेऊन गेला काय, हा सर्व प्रकार त्यास कांहींच न समजल्यामुळें तो अगदीं घाबरून गोंधळून गेला. कांहीं केल्या त्याच्या जिवास चैन पडेना. त्यानें आपल्यापुढील थैली लाथेनें बाजूस ढकलली, आणि आपल्या आसऱ्यास राहिलेल्या पाहुण्यास यवनांनीं पकडून नेण्याचे कामीं न समजतां तरी आपण कारण झालों असें म्हणून तो अत्यंत शोकाकुल झाला. याप्रमाणें दुःख करीत असतां त्यानें एकाएकी तानाजीस आपलेकडे येतांना पाहिलें, व पकडून नेलेल्या गोसाव्याच्या काशीस गेलेल्या तिघां भावांपैकीं हा एक असें त्यानें तत्काळ ओळखलें. तेव्हां आतां याला याच्या भावाबद्दल काय सांगूं, असें वाटून ब्राह्मणास जास्तच दुःख झालें. शिवाजीस सुभेदारानें पकडून नेलेलें तानाजीनें पाहिलेंच होतें. कारण तो अहोरात्र ब्राह्मणाच्या घराच्या आसपासच कोठें तरी असे. आपल्या डोळ्यांदेखत आपल्या प्राणाहून प्रिय स्वामीस नेतांना पहातांच तानाजीच्या मनाची जी स्थिति झाली, तिचें वर्णन करणें अशक्य आहे ! शेवटीं काय होईल तें होवो, जेथें शिवाजी तेथें आपण असा विचार करून, त्याजवर कांहीं प्रसंग आला असतां आपला जीव खर्ची पडेपर्यंत त्याचा बचाव कर-

ण्याचा यत्न करावयाचा, असा त्यानें निश्चय केला. मग तो कांहीं वेळ सुभेदाराच्या मागून चालला. पुढें सुभेदार शिवाजीसह आपल्या वाड्यांत शिरला, तेव्हां तानाजीही त्याच्या मागून जाऊं लागला. पण त्याला आंत कोणी सोडीना. तेव्हां निराश होऊन तो वेड्या-सारखा इकडे तिकडे हिंडूं लागला. इतक्यांत त्याच्या मनांत असें आलें कीं, हा सर्व प्रकार कसा झाला हें तरी ब्राह्मणाकडून समजून घ्यावें. म्हणून वर सांगितल्याप्रमाणें ब्राह्मण दुःख करीत असतां तो त्याच्या-जवळ गेला. ब्राम्हण शोकानें विव्हळ झालेला पहातांच तानाजीस अधिकच दुःख झालें. तथापि तें सर्व दुःख गिळवेल तितकें गिळून तो ब्राह्मणाजवळ जाऊन बसला, आणि त्याचें सांत्वन करून म्हणाला, ' महाराज, आतां व्यर्थ शोक करून उपयोग काय ? या आमच्या भावास पकडून नेण्याचें कारण काय, हें मला माहीत आहे. पण आधीं आपल्या घरीं काय प्रकार घडला तो मला सविस्तर सांगा. ' त्यावरून शिवाजीनें पत्र दिल्यापासून शेवटपर्यंत सर्व हकीकत ब्राह्मणानें तानाजीस सांगितली. ती ऐकून तानाजीनें त्यास विचारिलें, ' हा आमचा भाऊ अलीकडे अगदीं दुःखी असे कीं काय ? किंवा आपण त्याच्यासाठीं काल परवां नेहमीपेक्षां जास्त कष्ट घेतले कीं काय ? जें काय असेल तें संकोच न करतां सर्व सांगा. ' ब्राह्मणानें, आपणांस पडलेला उपास त्या गोसाव्याच्या नजरेस आला असावा, असें सांगितलें. हें ऐकतांच जसा एखादा मनुष्य अंधारांतून उजेडांत यावा तशी तानाजीची स्थिति झाली. शिवाजीचा स्वभाव त्याला पूर्णपणें माहीत असल्यामुळें, ब्राह्मणाचे उपकार फेडण्याकरितां त्यानें आपणास या संकटांत खचीत घातलें असावें, असें त्याच्या पूर्णपणें ध्यानांत आलें; व प्रेम, पूज्यबुद्धि आणि शोक हे विकार एकवटून ते त्याच्या नेत्रांतून अश्रुधारांच्या रूपानें वाहूं लागले ! नंतर आपण खरे कोण हें ब्राह्मणास सांगून

त्याच्या साह्यानें शिवाजीच्या सुटकेच्या यत्नास लागावें असा त्यानें विचार केला. कांहीं दिवसांच्या निकट सहवासामुळें ब्राह्मणाच्या मनाचा थोरपणा त्यास पक्का कळून आला होता, यामुळें याला आपली गुप्त गोष्ट सांगितली असतां ती बाहेर फुटेल ही भीति त्याला मुळींच नव्हती. मग मनांत आल्याप्रमाणें जेव्हां त्यानें आपण कोण, कोठले ही हकीकत इत्थंभूत ब्राह्मणास कळविली, तेव्हां त्यास मोठा विस्मय वाटला; आणि हिंदु लोकांचा कैवारी व हिंदुधर्मप्रतिपालक असा महात्मा शिवछत्रपति यवनांच्या हातांत फिरून सांपडण्यास आपण कारण झालों, हें आपल्या हातून फारच घोर पातक घडलें, असा विचार मनांत येऊन तो पुनः पराकाष्ठेचा कष्टी झाला. नंतर आतां पुढें काय करावयाचें याबद्दल तानाजीचें व त्याचें कांहीं वेळ बोलणें झाल्यावर, तानाजी सुभेदाराकडील बातमी काढण्याकरितां त्याच्या वाड्याकडे गेला, आणि आज रात्रीं बारा वाजतां वीस लोकांनिशीं, पकडून आणलेल्या मनुष्यास बरोबर घेऊन सुभेदारसाहेब दिल्लीस जाण्याकरितां निघणार, ही गुप्त बातमी तेथें त्यानें मोठ्या चातुर्यानें मिळविली. ही बातमी समजतांच तो परत ब्राह्मणाकडे आला. पुढें दोघांचें बराच वेळ बोलणें होऊन शेवटीं असें ठरलें कीं, सुभेदारानें दिलेल्या थैलीपैकीं लागेल तेवढा भाग खर्च करून पन्नास हत्यारबंद जवान तयार करावे, आणि त्यांसह तानाजीनें, ज्या झाडींत शिवाजीचा व वाघाचा सामना झाला, तेथें तावडतोब जाऊन दडून बसावें. तयारी होतांच तानाजी पठाणाचा पोषाख करून व ते पन्नास असामी बरोबर घेऊन चार तास रात्रीच्या सुमारास त्या झाडींत जाऊन बसला.

मध्यरात्र उलटून गेल्यावर सुभेदाराची स्वारी वीस शिपायांनिशीं शिवाजीसह त्या झाडींत येऊन पोहोंचली. त्याबरोबर तानाजीच्या लोकांनीं एकदम मोठी आरोळी ठोकून त्या लोकांवर हल्ला केला.

सुभेदाराजवळ तानाजीच्यापेक्षां लोक कमी होते, यामुळें या छाप्याचा शेवट काय झाला असावा हें वाचकांच्या ध्यानांत सहजच येईल! थोड्याच वेळांत तानाजीच्या लोकांनीं सुभेदार व त्याजबरोबरचे शिपाई या सर्वांस कापून काढलें, आणि तानाजीच्या इच्छेवरून त्यास व शिवाजीस तेथेंच सोडून ते परत शहरांत निघून गेले.

मग शिवाजीनें तानाजीस, हा सर्व प्रकार कसा घडला याबद्दलची हकीकत विचारली. ती त्यानें सांगितल्यावर, तानाजी व येसाजी यांचें आपल्या ठायीं असणारें निस्सीम प्रेम, आणि त्या ब्राह्मणाची लोकोत्तर थोरवी, हीं पाहून त्याला पराकाष्ठेचा गहिंवर आला. नंतर सुमारें दीड महिन्यानें शिवाजी, तानाजी, येसाजी व संभाजी असे बरोबरच दक्षिणेंत सुखरूप येऊन पोहोंचले. पुढें शिवाजीनें मोठमोठे पराक्रम करून मराठी राज्य कसें पूर्ण उदयास आणिलें ही हकीकत इतिहासप्रसिद्धच आहे.*

---

## इंग्लंडचा राजा तिसरा वुइल्यम आणि त्याच्या दरबारचा उमराव.

इ० स० १६८८ मध्यें इंग्लंडांत मोठी राज्यक्रांति होऊन दुसरा जेम्स हा राजा पदच्युत झाला व तिसरा वुइल्यम गादीवर बसला. पदच्युत झालेला जेम्स राजा हा फ्रान्स देशांत जाऊन राहिला होता. त्याच्याशीं जो कोणी पत्रव्यवहार ठेवील तो राजद्रोहाच्या गुन्ह्यास पात्र होईल असा इंग्लंडच्या दरबारीं ठराव झाला. तथापि कित्येक उमराव जेम्स राजाशीं गुप्त रीतीनें पत्रव्यवहार करीत होते.

*ह्या हकीकतींत शिवाजीचे मनाचा अलौकिक थोरपणा व त्याच्या सोबत्यांचें त्याच्या ठायीं अकृत्रिम प्रेम व ब्राह्मणाची लोकोत्तर परोपकाररतता आणि औदार्य ह्या गोष्टी दिसून येतात. तथापि यांत एकंदरीनें पाहिलें असतां सर्वांच्या मनाचा विलक्षण थोरपणा व्यक्त होतो. म्हणून ही गोष्ट याच सदराखालीं घातली आहे.

त्यांच्यांत अर्ल ऑफ गॉडॉल्फिन या नांवाचा एक उमराव होता. तो मोठा कुलीन असून लोकांत त्याचें वजन फार होतें. त्याच्याशीं वुइल्यम राजानें जें वर्तन केलें तें अत्यंत योग्य व थोरपणाचें होतें. त्यानें त्या उमरावास आपल्याकडे एकांतीं बोलावून त्याच्या हातचीं पत्रें पकडलीं होतीं तीं त्यास दाखविलीं; आणि त्यास म्हणाला, 'तुमच्याठायीं आपल्या पूर्वीच्या धन्याविषयीं जी पूज्यबुद्धि व आस्था वसत आहे ती फार प्रशंसनीय आहे. परंतु तुम्हीं काल-मानाकडेही लक्ष दिलें पाहिजे. स्वामिभक्तीच्या भरांत आपल्या सांप्रतच्या धन्यास अपायकारक अशी गोष्ट करण्यास तुम्ही प्रवृत्त होतां यास कोणीही शहाणा मनुष्य चांगलें म्हणणार नाहीं. तुम्ही सुज्ञ आहां, तेव्हां तुम्हांस जास्त सांगावयास नकोच. झाली ती गोष्ट झाली, पण आतां तुम्ही हा क्रम सोडून द्याल तर मला फार आनंद होईल, व पूर्वीचें कांहींएक मनांत न आणतां मी तुम्हांस माझ्या अत्यंत विश्वासू लोकांप्रमाणें मानीन.' असें म्हणून राजानें, त्या उमरावाच्या मनांत आपल्याविषयीं बिलकुल शंका राहूं नये म्हणून लागलीच तीं पत्रें तेथच्या तेथें जाळून टाकिलीं! हा राजाचा अलौकिक थोरपणा पाहून त्या उमरावास मोठा गहिंवर आला, व त्यानें राजापाशीं क्षमा मागितली. पुढें त्यानें वुइल्यम राजाच्या संबंधानें आपलें वर्तन इतकें उत्तम ठविलें कीं, राजा त्याला आपला अत्यंत जिवलग मित्र मानूं लागला.

## व्हिलासर्फ नांवाच्या बाईची गोष्ट.

युरोपियन लोकांत, लग्न होण्यापूर्वी स्त्रीपुरुषांची प्रीति एक-मेकांवर बसून नंतर पुढें कांहीं विशेष अडथळा न आल्यास त्यांचें लग्न होतें, हें बहुतेकांस ठाऊक असेलच. व्हिलासर्फ या नांवाची एक तरुण व अत्यंत रूपवती फ्रेंच स्त्री होती, ती व पारिस येथील

फेस्टो या नांवाचा एक नामांकित शस्त्रवैद्य या उभयतांची एक-मेकांवर प्रीति बसली. परंतु त्या दोघांची पदवी समान नसल्यामुळें त्यांचें लग्न जमलें नाहीं. पुढें फेस्टो यानें तिचा आपणाला विसर पडावा म्हणून तिच्याकडे जाणेंयेणें अगदीं सोडून दिलें. याप्रमाणें कित्येक वर्षें लोटलीं. पुढें त्या स्त्रीस कांहीं आजार झाल्यावरून तिला आपली एक शीर तोडविण्याचा प्रसंग आला, व तें काम फेस्टो याजकडेच आलें. याप्रमाणें तो आपलें काम करण्याकरितां गेला; परंतु त्याचें चित्त ठिकाणावर नसल्यामुळें त्याच्या हातून मोठी चूक झाली; ती ही कीं, जी शीर तोडावयाची तिच्या ऐवजीं त्याच्या हातून भलतीच तुटली गेली ! अशी भयंकर चूक झाल्या-मुळें त्या बाईच्या प्राणाशीं गांठ पडली. तरी तिनें आपलें चित्त यत्किंचित्‌ही अस्वस्थ होऊं न देतां ती अगदीं शांत राहिली. पुढें तीन दिवसांनीं वरील कारणामुळें तिचा सबंध हातच कापून काढण्याचा प्रसंग आला. इतकें झालें तरी, फेस्टो याजवर आपला बिलकुल राग नाहीं असें दाखविण्याकरितां त्या थोर स्त्रीनें असें केलें कीं, कारण पडल्यास तुम्हीं मला मदत कर-ण्यास व सल्ला देण्यास कृपा करून यावें अशी त्यास विनंती केली. नंतर थोड्याच वेळानें व्हिलासर्फ बाईची कठिण अवस्था झाली, व ती चोवीस तासांच्या आंत मरणार असें फेस्टो यास दिसून आलें. तेव्हां त्याचें तोंड अगदीं उतरून गेलें, व त्याच्या हृदयास इंगळी डसल्याप्रमाणें दुःख होऊं लागलें ! पण त्या उदार अंतःकर-णाच्या स्त्रीनें आपली शांत वृत्ति न सोडितां, ती लागलींच आपलें मृत्युपत्र तयार करण्यास लागली. तें झाल्यावर तिनें तेथल्या बाकीच्या लोकांस बाहेर जाण्यास सांगून फेस्टो यास आपल्यासमोर बोलावून म्हटलें, ' माझा अंतकाळ अगदीं समीप आला आहे, ज्याअर्थीं इतर मनुष्यांपेक्षां भिन्न अशी मनोवृत्ति माझ्याठायीं उत्पन्न

व्हावी हें मला उचित आहे. मी तुम्हांस अंतःकरणपूर्वक सांगतें कीं, तुमच्या हातून जी चुकी झाली तिजबद्दल माझ्या मनांत रागाचा लेशही नाहीं. ती चुकी झाल्याबद्दल मी उलटा आनंद मानतें; कां कीं, त्या योगानें मला उत्तम लोक लवकर प्राप्त होत आहे. पण असें इतर लोकांना वाटण्याचा संभव नाहीं; व ही गोष्ट पुढें तुमच्या रोजगाराला धक्का बसण्यास कदाचित् कारणीभूत होईल; सबब तसा प्रसंग आला असतां तुम्ही संकटांत पडाल, म्हणून मीं आपल्या मृत्युपत्रांत त्या संबंधानें जी काय तजवीज करावयाची ती करून ठेविली आहे.'

केवढें तरी हें मनाचें थोरपण ! पुढें असें कळून आलें कीं, त्या उदार स्त्रीनें आपल्या मालमत्तेचा बराच भाग त्या शस्त्रवैद्यास देण्याविषयीं मृत्युपत्रांत लिहून ठेविलें होतें !

## हावान्ना येथील गव्हर्नर.

दोन राष्ट्रांचा बेबनाव झालेला असतां प्रत्येकाला, दुसऱ्यास हरतऱ्हेनें होईल तितका त्रास देण्याचा आपला हक्क आहे, असें वाटत असतें. तीं एकमेकांच्या देशांत आपलीं सैन्यें लढण्याकरितां व लूट करण्याकरितां पाठवितात, तसेंच आपापलीं आरमारें घेऊन समुद्रावरही तीं लढाई करीत असतात. अशा महा अनर्थाच्या प्रसंगीं—कीं ज्या वेळेस प्रत्येक पक्षाकडील लोकांस प्रतिपक्षाचा होईल तितका नाश करण्याखेरीज दुसरें कांहींच सुचत नाहीं तेव्हां—जे लोक शत्रूंवर उपकार करतात अथवा त्यांच्याशीं निदान न्यायानें वागतात, ते अत्यंत थोर व धन्य होत यांत संशय नाहीं.

इ० स० १७४६ या वर्षीं इंग्लंड व स्पेन ह्या दोन देशांमध्यें लढाई चालली होती. त्या वेळीं लंडनचें 'इलिझाबेथ' या नांवाचें पुष्कळ किंमतीचा माल भरलेलें व्यापारी जहाज अमेरिकेस चाललें

असतां, जमेका आणि क्यूबा या बेटांच्या दरम्यान त्याला भोंक पडून त्यांत पाणी येऊं लागलें, व लवकरच तें जहाज बुडेल असा सुमार दिसूं लागला. त्या जहाजावरील लोकांनीं जीवरक्षणार्थ तें जहाज हावान्ना नांवाच्या बंदरीं नेलें. परंतु तें बंदर स्पेनच्या ताब्यांतलें असल्यामुळें, व स्पेन आणि इंग्लंड यांच्यांत वर सांगितल्याप्रमाणें लढाई चालू असल्यामुळें जहाजावरील लोकांस वाटलें कीं, येथील लोक आपणांस कैद करतील व आपलें जहाज व माल बळकावतील यांत संशय नाहीं. तेव्हां जहाजावरील कप्तानानें विचार केला कीं, आपण होऊनच जहाज व माल गव्हर्नराच्या ताब्यांत दिला असतां त्याजकडून आपणांस व आपल्या लोकांस कदाचित् फारसा त्रास न होतां आपली सर्वांची सुटका होईल. त्याप्रमाणें त्यानें गव्हर्नराकडे जाऊन त्यास विनंती केली कीं, ' आपण हें जहाज मालासह ताब्यांत घ्यावें, आमची कांहींएक तक्रार नाहीं. मात्र आम्हांस कैद न करितां सोडून देण्याची तेवढी मेहेरबानी करावी. ' परंतु गव्हर्नरानें त्यास सांगितलें कीं, ' आम्हांस तुमचें जहाज किंवा माल मुळींच नको, व तुम्हांलाही आमच्याकडून कांहींएक उपद्रव होणार नाहीं. तुम्ही शत्रुभावानें जर येथें आलां असतां तर ती गोष्ट निराळी होती. पण तुम्ही संकटांत पडल्याकारणानें जीव वांचविण्याकरितां येथें आलां आहां, त्याअर्थीं तुम्हांस कोणत्याही प्रकारें तोशीस न देतां उलट साहाय्य करावें हा माझा धर्म आहे. जा तर तुम्ही आपल्या जहाजावर. आम्हांकडून तुम्हांस कांहींएक अडथळा नाहीं. तुम्हांला आपलें जहाज नीट करण्याकरितां जो पैसा लागेल तेवढा उत्पन्न होण्याकरितां तुम्ही आपला मालही येथें पाहिजे तर विका, व नंतर तुमची सर्व सोय झाल्यावर खुशाल निर्भयपणें निघून जा. ' हें त्या गव्हर्नराचें वर्तन पाहून कप्तानास व त्याच्या लोकांस

किती नवल वाटलें असेल, व त्याच्या थोरपणाबद्दल त्यांनीं त्याचें किती अभिनंदन केलें असेल बरें !

मग ' इलिझाबेथ ' जहाजाच्या कप्तानानें त्या जहाजाची थोडक्याच दिवसांत दुरुस्ती केली. पुढें तेथून निघण्याच्या वेळीं ते सर्व लोक गव्हर्नराचा निरोप घेण्याकरितां गेले असतां त्यानें त्यास एक परवानाही दिला. त्या परवान्यांत स्पेनच्या लढाऊ जहाजांपासून त्या हद्दींत त्यांना कांहीं उपद्रव होऊं नये, असें होतें. असो; पुढें तें जहाज तेथून निघून थोडक्याच दिवसांत लंडन येथें सुरक्षित येऊन पोहोंचलें.

## थोरले बाजीराव पेशवे *

थोरले बाजीराव म्हणजे बाजीराव बल्लाळ पेशवे व निजामउलमुल्क यांची सन १७२८ मध्यें गोदावरीचे कांठीं लढाई झाली. तींत मराठ्यांचा जय झाला, व मुसलमानांची दाणादाण होऊन त्यांच्या लष्करांत धान्यादिकांचा तोटा पडला. त्याच संधीस मुसलमानांचा एक सण आला. त्या प्रसंगीं निजामानें बाजीरावसाहेबांकडे वकील पाठवून विनंती केली कीं, ' लष्करांत महागाई झाली आहे, यास्तव दाणाकिराणा पाठवून द्यावा. ' तेव्हां बाजीरावसाहेबांनीं याचा विचार काय करावा म्हणून आपल्या मुख्य मंडळीस पुसलें. त्यावरून कोणीं अशी मसलत दिली कीं, आपण कांहींएक पाठवूं नये, म्हणजे निजामाला आयताच पुरता जेरीस आणावयास चांगलें साधन होईल. परंतु ही गोष्ट पेशव्यांस रुचली नाहीं. त्यांनीं म्हटलें कीं, ' आपला शत्रु आजारी अथवा भुकेला अथवा निजला असतां नाश करणें आमचें शिपाईगिरीस योग्य नव्हे. नबाबांनीं सांगून पाठविलें त्यापेक्षां गौरव करावा. ' असें बोलून त्यांनीं धान्यादि सर्व सामुग्री पांच हजार बैल भरून निजामाचे लष्करांत पाठवून दिली. त्यावरून

* ही गोष्ट काव्येतिहाससंग्रहावरून लिहिली आहे.

निजामास फार संतोष झाला, व लवकरच उभयतांचा सल्ला होऊन भेटी झाल्या. थोरले बाजीराव पेशवे यांचा थोरपणा व पोंच आणि धाकटे बाजीराव यांची एकंदर वागण्याची रीत, यांत केवढें महदंतर दिसून येतें बरें !

---

## इंद्रियांस प्रार्थना.

### आर्या.

**करहो** ! करा निरंतर सत्पात्रीं सानथोर उपकार
यापरतें पुण्य नसे कथिती आग्रह करून बुध फार. १
श्रीमंत वा दरिद्री हो हें वेंपु खचित खचित जायाचें
मग माजवूनि याचें काय असे पुढतिं तें करायाचें ! २
**जिव्हे** ! सत्य मधुर बहु भाषण कर कीर्तनीं सदा रम गे
मग तुज पीयूषाची आशा जन्मांत वाहणें नलगे ! ३
बाई ! निजप्रभावें त्वां पातकराशि तारिले प्राणी
हें सामर्थ्य करोनी माझ्या तूं प्रत्यया दया आणीं. ४
**नेत्रांनो** ! अवलोका सृष्टपदार्थांतले चमत्कार
जीवा तेणें होतो आल्हाद खरोखरीच अनिवार ! ५
येतें लक्षांत तदा शक्ती विश्वाचिया रचितयाची
होते उत्पन्न मनीं भक्ति परम निर्मला तिनें साची ! ६
त्यानें लावून दिल्या मार्गे जीवंत आणि निर्जीव
जाती चुकती न कधीं ! पाहुनि गमतो पराक्रम अतीव. ७
हरिकीर्तन साधुवचन सुज्ञमतविवेचनें अहो **कान** !

---

१ शरीर. २ अमृताची. ३ आपल्या प्रतापानें. ४ मोठे पापी. ५ ‘करोनी’ याचें कर्म ‘दया.’ ६ त्यावेळेस. ७ रचणाराची. ८ अतिशय, अत्यंत थोर. ९ सज्जनांना मान्य असे विचार.

ऐका त्यांतचि लाधे अप्रतिम खरोखरी समाधान. ८
बापा मना ! करावें त्वां चिंतन नित्य देवरायाचें
आहे आनंदाचें साधन भवसिंधु हें तरायाचें
सारांश मागणें कीं शास्त्रविहित हित असेल तें सारें
साधूनि जीविताचें सार्थक्य करा सदा तदाधारें. १०
हा जीव दीन केवळ ह्याचें हित सर्व तूमच्या हातीं
तें श्रम करोनि पावा याचि पथें थोर थोर ते जाती. ११

---

## सेव्यसेवकसंबंध.

सेव्यसेवकसंबंध म्हणजे धनी आणि चाकर यांचा संबंध. हा संबंध सर्व काळीं आणि सर्व ठिकाणीं चालू असलेला दृष्टीस पडतो. जगामध्यें मनुष्यांना परमेश्वरानें निरनिराळ्या प्रकारची स्थिति दिली आहे. त्यामुळें हा संबंध उत्पन्न झाला आहे. वास्तविक पाहतां मनुष्यें तेथून सारीं सारखीं, तेव्हां त्यांच्यांत असा भेदाभेद असणेंच मुळीं बरोबर नाहीं, असें कोणी म्हणतील. पण या गोष्टीचा विचार करण्याचें हें स्थळ नाहीं. शिवाय असा भेदाभेद असल्यावांचून जगाची रहाटी नीट चालावयाची नाहीं हें विचाराअंतीं आपणांस कबूल करावें लागेल. असो; तर यावरून धनी आणि चाकर हा संबंध जगास एकंदरीनें हितावह आहे असें झालें. तेव्हां ज्याच्या ज्याच्या नशिबानें ज्याला ज्याला यांपैकीं जी जी स्थिति प्राप्त झाली असेल, तिला अनुरूप असें त्यानें वर्तन करून आपलें कर्तव्यकर्म बजाविलें पाहिजे हें उघड आहे. तसें केलें असतां उभयतांसही सुख होईल. चाकरानें आपलें काम योग्य रीतीनें बजावून धन्याशीं अदबीनें वागलें पाहिजे; तसेंच धन्यानेंही चाकराशीं सभ्यपणाचें व ममतेचें वर्तन ठेविलें पाहिजे.

---

१ संसाररूपी समुद्र. २ शास्त्रानें सांगितलेलें, शास्त्रसंमत. ३ त्याच्या आधारानें ( योगानें ).

अशा रीतीनें धनी चाकराशीं वागला असतां चाकर बहुधा कामांत चुकवाचुकव करणार नाहीं, इतकेंच नाहीं तर त्याची आपल्या धन्याच्या ठायीं ममता जडून तो धन्याचें काम, केवळ मजुरीकरितां नव्हे, तर तें आपलेंच समजून जास्त कळकळीनें करील. कित्येक इमानी चाकरांचीं तरी अशीं उदाहरणें दृष्टीस पडतात कीं, त्यांनीं आपल्या धन्याकरितां आपले जीवही दिले आहेत !

### फ्रेडरिक दि ग्रेट आणि त्याचा हुजऱ्या.

एके दिवशीं प्रशियाचा नामांकित राजा फ्रेडरिक दि ग्रेट हा आपल्या एकांताच्या खोलींत बसला असतां त्याला कांहीं वस्तूची गरज लागली, म्हणून हुजऱ्याला आंत बोलावण्याकरितां त्यानें घंटी[1] वाजविली. परंतु कोणीही आलें नाहीं असें पाहून, ज्या ठिकाणीं त्याच्या हुजऱ्याची बसावयाची जागा होती तेथें तो गेला; तों हुजऱ्या कोचावर स्वस्थ निजलेला त्याच्या दृष्टीस पडला. राजा त्याला जागा करणार, इतक्यांत त्या हुजऱ्याच्या खिशांत कागद होता तो अर्धा बाहेर आलेला त्यास दिसला. त्यांत काय लिहिलें आहे तें पहावें अशी राजास इच्छा झाली. त्यावरून त्यानें तो कागद हळूच घेतला, व वाचून पहातो तों याच्या आईनें याला हें पत्र पाठविलें आहे असें त्यास दिसून आलें. त्या पत्रांत तिनें आपल्या मुलास, आपल्या पगारापैकीं कांहीं पैसे शिल्लक राखून ते आपल्यास पाठवून दिल्याबद्दल मोठें समाधान दर्शविलें होतें, व तूं आपल्या दुबळ्या आईवर इतकें प्रेम ठेवतोस तर ईश्वर तुझें कल्याण करील, असें शेवटीं लिहिलें

---

१ युरोपियन लोकांत नोकराला बोलवावयाचें असलें म्हणजे त्यास हांक मारावयाची खटपट न पडावी म्हणून घंटा वाजविण्याची तजवीज केलेली असते हें पुष्कळांस ठाऊक असेलच. घंटा वाजविली कीं, नोकर पुढें येऊन उभा राहतो.

होतें. तें पत्र वाचून झाल्यावर राजा हळूच आपल्या खोलींत परत गेला, आणि त्या देशांत चालू असलेलें डयूकट या नांवाचें सुमारें अडीच रुपये किंमतीचें एक नाणें होतें तसलें मूठभर नाणें घेऊन, तें पत्र व नाणें असें त्यानें हुजऱ्याच्या खिशांत हलकेंच सोडून दिलें. नंतर फिरून त्यानें खोलींत येऊन खूप मोठ्यानें घंटा वाजविली. त्यासरसा तो हुजऱ्या जागा झाला, व लगबगीनें खोलीचें दार उघडून राजाच्या समोर येऊन उभा राहिला. राजा त्यास म्हणतो, 'कायरे, तुला मोठी नामी झोंप लागली होती नाहीं ?' तें ऐकून, 'मजकडून मोठी चूक झाली, याबद्दल क्षमा असावी,' असें तो म्हणत असतां त्याचा हात सहज खिशांत गेला. तेव्हां तें नाणें त्याच्या हाताला लागल्याबरोबर त्याला मोठें आश्चर्य वाटलें व त्याचें तोंड खाडकन् उतरून गेलें. त्यानें तें नाणें बाहेर काढलें, व डोळ्यांना पाणी आणून राजाकडे पहात तो स्तब्ध उभा राहिला; कां कीं, त्याच्या तोंडांतून शब्दही निघेना, इतका त्याचा घोंटाळा होऊन गेला. हें पाहून राजा त्यास विचारतो, 'कांरे, असें काय करतोस ? इतक्याच्या इतक्यांत तुला काय झालें ?' तो राजाच्या पायां पडून म्हणतो, 'महाराज ! माझा कोणी तरी नाश करण्यास प्रवृत्त झाला आहे असें मला वाटतें. हें नाणें माझ्या खिशांत कसें आलें हें मला कांहीं समजत नाहीं !' राजा त्यास म्हणतो, 'त्याबद्दल तुला कांहीं फिकीर वाटूं देऊं नको. ईश्वराला दया येऊन एकादे वेळेस आपण झोंपेंत असतांना तो आपल्याला लाभ करून देतो असें घडतें. हे पैसे आतां तूं आपल्या आईकडे पाठीव आणि तिला असें कळीव कीं, यापुढें मी तुम्हां उभयतांचाही समाचार घेईन.' हें राजाचें बोलणें ऐकून त्या हुजऱ्याला आपल्या धन्याविषयीं काय वाटलें असावें याची वाचणाऱ्यांनींच कल्पना करावी !

## एका शिपायाचें अलौकिक औदार्य आणि स्वामिभक्ति.

आस्ट्रिया देशामध्यें कार्पेथियन पर्वतावर व त्याच्या आसपास पूर्वीं लांडग्यांचा भारी उपद्रव असे. इ० स० १७७६ या वर्षीं कोणी एक सरदार व्हिएना येथून क्राको शहरास गाडींत बसून चालला असतां लांडग्यांची एक टोळी त्याच्या गाडीमागें लागली. त्यानें आपल्याबरोबर दोन शिपाई घोड्यांवर बसवून घेतले होते. या लोकांच्या मागें लांडगे लागले त्या वेळीं ते क्राको शहरापासून फारसे दूर नव्हते, तरी तेथें पोहोंचण्यापूर्वीं लांडगे आपल्याला गांठल्यावांचून रहाणार नाहींत असें त्यांस वाटल्यावरून, झेटर या नांवाचें एक शहर अगदीं जवळ होतें तेथें जाण्याचा त्यांनीं बेत केला. सरदारानें आपल्याबरोबरच्या घोडेस्वारांपैकीं एकास गाडीपुढें केलें, व जो त्याच्या फारच विश्वासांतला होता त्यास मागून चल म्हणून सांगितलें. याप्रमाणें ते भराभर रस्ता काटीत चालले तरी झेटर येथें पोहोंचण्यापूर्वींच लांडगे आपणांला गांठतील असें त्यांस वाटल्यावरून, सरदाराच्या पाठीमागील स्वारानें असें सांगितलें कीं, 'मला परवानगी होईल तर मी आपला घोडा ह्या लांडग्यांकरितां सोडून देतों, म्हणजे ते त्याच्या व्यवस्थेंत गुंतले आहेत तों आपण मुक्कामाला निघून जाऊं.' सरदारानें त्यास रुकार दिला. तेव्हां शिपायानें घोडा सोडून देऊन तो गाडीच्या पाठीमागच्या जागीं उभा राहून चालला. घोडा सोडून दिल्याबरोबर लांडग्यांनीं त्याचे फाडून तुकडे केले! इकडे ही मंडळी खूब जलदी करून गाडी हांकीत चालली होती, व आपण सुरक्षितपणें शहरास पोहोंचूं असें त्या सर्वांस वाटलें होतें. पण गाडीचे घोडे थकले, व लांडग्यांनाही मागें सांगितलेली शिकार सांपडल्यामुळें त्यांस ज्यास्तीच चेव आला, आणि त्यांनीं भराभर धांवून गाडी गांठण्याचा रंग आणिला. तेव्हां

सर्वांस पराकाष्ठेची चिंता पडली. पण इतक्यांत त्या गाडीमागें असलेल्या शिपायानें आपल्या धन्यास म्हटलें, ' आतां विचार करण्यास वेळ नाहीं. तुम्ही जर माझी बायको व मुलें यांचें बापाप्रमाणें पालनपोषण करण्याविषयीं वचन देत असाल, तर तुम्हां सर्वांकरितां मी लांडग्यांस बळी जातों; याखेरीज तुमची सुटका होण्यास दुसरा इलाज नाहीं. ' सरदारानें ही गोष्ट कबूल करण्यास थोडा अनमान केला. पण असें न केल्यास आपल्यापैकीं कोणीही मनुष्य वांचणार नाहीं असें जाणून त्यानें त्या गोष्टीस मोठ्या कष्टानें रुकार दिला; आणि, तुझ्या कुटुंबाचें मी पालनपोषण करीन अशी लागलींच शपथ वाहिली. त्याबरोबर शिपाई गाडीखालीं उतरला, व थोडक्याच वेळानें लांडग्यांच्या भक्ष्यस्थानीं पडला ! पण त्या योगानें बाकीचीं सर्व माणसें वांचलीं. पुढें सरदारानें बोलल्याप्रमाणें आपला शब्द खरा करून दाखविला हें सांगावयास नकोच !

## भानु व टिळेकर.

प्रख्यात मुत्सद्दी बाळाजी जनार्दन भानु, म्हणजे नाना फडनवीस, यांचे पूर्वज बाळाजी महादेव भानु यांच्या अपूर्व स्वामिभक्तीची एक गोष्ट लिहिलेली आढळली, ती अशीः—बाळाजी विश्वनाथ पेशवे यांनीं आपले धनी थोरले शाहूमहाराज यांजकरितां दिल्लीचे बादशाकडून चौथाई व सरदेशमुखी हे हक्क संपादिले, ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. ह्या दोन्ही हक्कांच्या सनदा मराठ्यांस मिळाल्या हें दिल्लीच्या दरबारी लोकांस सहन न होऊन त्यांनी असा बेत केला कीं, पेशवे सनदा घेऊन दरबारांतून निघाले म्हणजे रस्त्यानें त्यांस गांठून गर्दी करावी व सनदा हिसकावून घ्याव्या. हा बेत पेशव्यास कळल्यावर त्यांनीं भानू यांस पुसलें कीं, ' याचा विचार काय ? ' भानूंनीं लागलेंच उत्तर केलें, ' ठीक आहे. मी तुमचे पालखींत बसून जातों व तुम्हीं सनदा काखेस मारून दुसऱ्या वाटेनें जा. '

याप्रमाणें व्यवस्था होऊन भानु हे पेशवे म्हणून पालखींत बसून चालले असतां मुसलमानांनीं त्यांजवर हल्ला केला. त्या हल्ल्यांत भानु हे प्राणास मुकले. केवढी त्यांची स्वामिभक्ति ! तिचें वर्णन करावें तेवढें थोडेंच आहे ! *

ह्याचप्रमाणें, नारायणराव पेशवे यांस मारेकऱ्यांनीं शनवारच्या वाड्यांत मारिलें, त्या प्रसंगीं त्यांचा परम विश्वासू हुजऱ्या चांपाजी टिळेकर म्हणून होता, त्यास आपल्या डोळ्यांदेखत आपल्या धन्याचा प्राण घेतलेला पाहण्यापेक्षां त्याच्या बचावासाठीं आपण आधीं मरावें हें फार बरें असें वाटून, तो नारायणरावांच्या अंगावर पडला. तेव्हां मारेकऱ्यांनीं उभयतांसही ठार मारलें हें प्रसिद्धच आहे!

## आल्फान्सो राजाची थोरवी.

इसवी सनाच्या पंधराव्या शतकांत सिसिली आणि नेपल्स यांचा आल्फान्सो या नांवाचा मोठा प्रख्यात राजा होऊन गेला. त्याची आपल्या प्रजेवर केवळ बापाप्रमाणें ममता असे. तो सिसिली बेटांत युद्ध करीत असतां एक नदी उतरून त्याला सैन्यासह पलीकडे जावयाचें होतें; परंतु शत्रूकडून त्याला अडथळा होऊन सारा दिवस सैन्यासुद्धां त्याला त्या नदीचे कांठीं उपाशीं राहावें लागलें. संध्याकाळ झाली तेव्हां एका शिपायानें थोडी भाकरी व दहीं आणून राजापुढें ठेविलें. वास्तविक पाहतां तशा स्थितींत त्याला तें पंचपक्वान्नापेक्षां अधिक होतें. तथापि त्यानें त्या शिपायाचे आभार मानून त्याला ती भाकरी व दहीं परत घेऊन जाण्यास सांगितलें. तो म्हणाला, ' माझ्याप्रमाणेंच माझे हजारों शूर लोक उपाशीं असतां मी तेवढें आपलें पोट भरून घेऊं काय? छे ! छे ! असें कदापि माझ्या हातून होणार नाहीं !

---

* ही गोष्ट ' काव्येतिहाससंग्रहा ' वरून घेतली आहे.

हा राजा आपल्या राज्यांतील एका प्रांतांत एकदां वेष पालटून फिरत असतां एका खेंचरवाल्याचें खेंचर चिखलांत रुतलें. तेव्हां त्यानें जे जे लोक आढळले त्यांस आपल्याला मदत करण्याविषयीं विनंती केली. परंतु कोणींही त्याकडे लक्ष्य दिलें नाहीं. इतक्यांत राजा घोड्यावरून चाललेला त्याच्या नजरेस पडला. त्यानें त्यास न ओळखल्यामुळें, मला मदत करावयास तुम्ही येतां काय, म्हणून म्हटलें. तेव्हां राजा लागलाच घोड्यावरून उतरला, व त्यानें त्या मनुष्यास सहाय्य केल्यावर त्या दोघांनीं मिळून तें खेंचर बाहेर काढिलें. खेंचरवाल्यास पुढें जेव्हां कळलें कीं, ज्यास आपण मदत करावयास बोलाविलें तो राजा होता, तेव्हां तो लागलाच त्याजकडे जाऊन त्यानें त्याजपुढें गुडघे टेंकिले व क्षमा मागितली. तेव्हां राजानें हंसून म्हटलें, ' अरे, तुला इतकें करावयाचें कांहीं कारण नव्हतें, कां कीं, तूं कांहीं अपराध केला होतास असें मुळींच नाहीं ! '

ह्या राजाची आणखी एक गोष्ट अशी सांगतात कीं, तो आपल्या राज्यांत वाटेल त्या वेळेस व वाटेल त्या ठिकाणीं कांहीं लवाजमा किंवा शिपाई वगैरे न घेतां एकटा फिरत असे. त्यावरून कोणीं एकानें, असें करणें धोक्याचें आहे, असें त्यास म्हटलें. तेव्हां राजानें त्यास उत्तर केलें, ' अं:, त्यांत काय आहे ? बापाला आपल्या मुलांपासून भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं ! '

## प्लांकस आणि त्याचे गुलाम.

रोमन लोकांचा पहिला प्रख्यात बादशाहा आगस्टस् सीझर यांच्या पक्षाचा जय होऊन तो राज्यारूढ झाला; त्या वेळीं त्याच्या विरुद्ध असणाऱ्या रोम येथील लोकांस जीव वांचविण्याकरितां तेथून पळून जावें लागलें. त्यांत त्या ठिकाणीं पूर्वीं माजिस्ट्रेटाच्या कामावर असलेला प्लांकस् या नांवाचा गृहस्थ होता; त्यालाही पळून जाण्याची

खाली आली. तेव्हां त्याच्या घरच्या गुलामांनीं त्याचा शोध लावून द्यावा म्हणून बादशाहाचे कामगारांनीं त्याजवर पराकाष्ठेची सक्ती केली, व दररोज त्यांचा छळ करण्याचीं नवीं नवीं साधनें काढून, त्या लोकांनीं त्या गुलामांस त्राहि त्राहि करून सोडिलें ! हें ग्लांकस् यास कळल्यावर त्याला अतिशय वाईट वाटून तो मनांत म्हणाला, माझ्या एकट्याच्या जिवाकरितां ह्या इतक्या प्रामाणिक व निरुपद्रवी लोकांस जाच व्हावा हें अगदीं रास्त नाहीं.' असें म्हणून तो आपण होऊन शहरांत आला, आणि जे लोक त्याच्या शोधाकरितां फिरत होते त्यांच्या स्वाधीन झाला. हें त्या सेव्यसेवकांचें लोकोत्तर प्रेम पाहून त्या लोकांचें अंतःकरण द्रवलें, व ती गोष्ट बादशाहाचे कानीं जाऊन त्यालाही मोठें आश्चर्य वाटलें; आणि त्यानें ग्लांकस् यास क्षमा केली. तसेंच हा अलौकिक प्रकार पाहून लोक म्हणूं लागले कीं, 'असल्या इनामी सेवकांस ग्लांकस् हाच योग्य धनी, व त्यांची सेवा करण्यास हेच लोक योग्य ह्यांत संशय नाहीं !'

## एका हबशिणीची गोष्ट.

सेंट डोमिंगो नांवाच्या बेटांत एकदां भूकंपानें मोठा अनर्थ करून सोडिला. त्या प्रसंगीं एका गृहस्थाच्या घरीं एक हबशीण दासी असून ती घरधन्याच्या मुलास खेळवीत असतां पुढील हृदयद्रावक गोष्ट घडली. ती अशी:—

वरील भूकंपाच्या सपाट्यांत एकाएकीं तें घर पडूं लागलें, तेव्हां त्या गडबडींत जो तो आपला जीव घेऊन घराबाहेर पडला. परंतु त्या स्त्रीस आपल्या ताब्यांतलें मूल टाकून जाववेना. त्यास घेऊन ती बाहेर पडावयास पाहते तों तिला जाण्यास मार्ग नाहींसा झाला. तेव्हां तिला आपल्या स्वतःच्या जिवापेक्षां आपल्या जवळच्या बालकाची फार काळजी वाटून, तिनें आपलें अंग कमानीसारखें केलें व त्याखालीं त्यास ठेविलें—अशाकरितां कीं, सुदैवानें घराचा थोडाच

भाग कोसळला तर आपल्या अंगावर तो पडून मूल वांचावें. पुढें पाहतात तों मूल चांगलें सुरक्षित राहून बचावलें; परंतु त्या हबशिणीच्या अंगावर लांकडें, धोंडे, वगैरे जें सामान पडलें, त्याच्या योगानें तिला मोठी इजा होऊन ती लागलीच मरण पावली.

आफ्रिकेंतील काळे अडाणी लोक केवळ पशूंप्रमाणें असून त्यांना समजूत व दयामाया मुळींच नाहीं असें पुष्कळ लोक समजतात, व सुमारें सवाशें वर्षांपूर्वी तर सुधारलेल्या युरोपियन लोकांपैकीं पुष्कळजण त्यांचा गुरांढोरांप्रमाणें व्यापार करीत असत. परंतु त्या आफ्रिकन लोकांतही अशीं गहिंवर येण्यासारखीं कित्येक उदाहरणें पाहूं गेलें असतां दृष्टीस पडतील. सारांश, परमेश्वरानें कोठें काय ठेविलें आहे याचा आम्ही पामरांस कधींही अंत लागावयाचा नाहीं !

---

## सुखाचीं खरीं साधनें.

### श्लोक.

सुखाचीं खरीं साधनें पांच होती
तुम्हां सांगतों आयका कीं अहो तीं
न तीं मागणें लागताती कुणाशीं
पडाया नको त्यांजसाठीं प्रयासीं. १

**खरें वागणें** हें किती स्वल्प आहे !
अजाणासुजाणांस तें साध्य राहे
तयानें जिवीं नांदते शांति मोठी
तशी ये न संपादिल्या द्रव्यकोटी ! २

धरी **नम्रता** आवडे तो जनातें
स्वबंधू तसें लाविती सर्व नातें
मिळे पाहिजे तें तयाला स्वभावें
स्वचित्तीं कुढावें तया हें न ठावें ! ३

मनीं तृप्ति ठेवी सदा तुष्ट राहे
  न कंटाळतां कष्ट दुःखास साहे
कधींही कुणाला म्हणे दे न जो तो
  स्वतंत्रत्व भोगोनियां पूज्य होतो. ४

परातें सदा तुष्टवाया झटावें
  असे एवढें मात्र ज्या काम ठावें
तया भी सदा मत्सरू दूर जाई
  घडे निश्चयें स्वास्थ्य त्या सर्व ठायीं. ५

धरोनी मनीं चार या साधनांतें
  करा ईश्वरीं नित्य आराधना ते
तुम्हां सौख्य लाधेल—लागेल मार्गे !
  नव्हे प्राप्त जें मोठियां योगयागें ! ६

---

## प्रामाणिकपणा.

### देवघेवीविषयीं.

देवघेव किंवा इतर कोणत्याही प्रकारचा व्यवहार असो, त्यांत मनुष्यांनीं एकमेकांस ठकविण्याविषयीं कधींही यत्न करितां कामा नये. व्यापाऱ्यांचीं वजनें, मापें एक रतीभारही कमीजास्ती असतां उपयोगी नाहीं. मालाची जी खरी किंमत असेल तीच व्यापाऱ्यानें सांगावी, व गिऱ्हाईकानें त्या किंमतीच्या मानानें बरोबर जिन्नस घ्यावा, कमजास्त घेऊं नये, हेंच रास्त आहे.

कांहीं लोकांस असें वाटतें कीं, देवघेव करतांना आपल्याकडून होईल तितका दुसऱ्यास हात दाखवावा यांत मोठें शहाणपण आहे, व यांत कांहीं गैरवाजवी नाहीं. उदाहरणार्थ अ आणि ब ह्या दोघांचा व्यवहार चालला आहे असें घेऊं. अला वाटतें कीं मीं

बला दिलेला जिन्नस बरोबर व चांगला आहे हें पहाणें बेंचें काम आहे, व त्याप्रमाणें चौकशी वगैरे करून त्यानें तो न घेतल्यास त्यांत त्याचा दोष आहे, आपलेकडे कांहींएक नाहीं. शिवाय तो असें घेऊन चालत असतो कीं, बपासून मला असाच जर कांहीं जिन्नस घ्यावयाचा झाला तर तोही माझ्याप्रमाणें करण्यास चुकणार नाहीं; तेव्हां सांप्रतच्या आपल्या आचरणांत मुळींच दोष नाहीं. अशा प्रकारचा युक्तिवाद हा अत्यंत नाशकारक होय. कांहींही झालें तरी कोणीं कोणास ठकविणें, मुलथाप देणें किंवा कोणाशीं कपट करणें हें अन्यायाचें काम होय. पुढें ब आपल्याला कधीं तरी ठकवील अशी कल्पना करून अनें त्या पोकळ सबबीवर त्यास फसविणें, यापेक्षां अनेंच असा विचार करावा कीं, ब मला ठकवील तर ठकवो, पण मी त्याला किंवा दुसऱ्या कोणालाही ठकविणार नाहीं !

दुसऱ्याच्या वस्तूंचा अभिलाष केल्यानें कधींही कोणाला बरकत यावयाची नाहीं. कदाचित् तो कायद्याच्या कचाट्यांत सांपडला नाहीं तरी त्याची लबाडी लोकांस कळून आली म्हणजे त्याच्याशीं कोणीही व्यवहार करीत नाहीं, व ह्या योगानें त्याचें अर्थातच नुकसान होतें. मनुष्याची एकदां नापत झाली म्हणजे व्यवहारासंबंधानेंच नुसतें त्याचें नुकसान होतें असें नाहीं, तर हरएक प्रसंगीं लोक त्याजविषयीं नाक मुरडतात, व त्याला आपल्या दाराशीं उभें करीत नाहींत; व इतकें झाल्यावर जरी त्यानें चोख रीतीनें वागण्याचा यत्न केला, तरी त्यापासून कांहींएक उपयोग होत नाहीं.

---

## दुकानावरील एका प्रामाणिक मुलाची गोष्ट.

लखनौ येथें कोणी एकानें आपला मुलगा एका कापडवाल्याच्या दुकानीं नोकरीस ठेविला. तो कांहीं दिवस त्याच्या येथें राहिल्यावर,

एके दिवशीं कोणी एक बाई त्याच्या दुकानीं कापड घेण्याकरितां आली. त्या मुलानें तिला कापड दाखविल्यावर किंमतीचा ठराव होऊन त्यानें तिजपासून किंमत घेतली, आणि तिला तो कापड बांधून देऊं लागला. इतक्यांत कापडाला भोंक असलेलें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यावरून तो म्हणाला, 'बाईसाहेब, ह्या कापडाला भोंक आहे, याकरितां हें ठेवून मी तुम्हांस दुसरें देतों.' असें म्हणून त्यानें तिला दुसरें कापड देऊन वाटेस लाविलें. ह्या मुलानें असा हा व्यवहार केलेला पाहून त्याच्या धन्यानें लागलीच रागानें त्याच्या बापास एक चिठी खरडली. तींत तुमच्या मुलाला व्यवहारज्ञान मुळींच कसलें तें नाहीं, ह्याकरितां तुम्ही त्याला घेऊन जा, असें त्यानें लिहिलें.

चिठींतील मजकूर वाचून त्या मुलाचे बापास फार विस्मय वाटला; कां कीं, आपल्या मुलाच्या हातून वाईट गोष्ट कदापि होणार नाहीं असा त्याला पक्का भरंवसा होता. असो; मग तो त्याच पावलीं त्या दुकानदाराकडे आला, व 'माझ्या मुलास व्यवहारज्ञान नाहीं असें जें आपण लिहिलें त्याचा अर्थ काय?' असें त्यानें त्या व्यापाऱ्यास विचारिलें. व्यापाऱ्यानें उत्तर केलें, 'अहो देवघेव करतांना खुबीनें कसें वागावें तें ह्याला मुळींच कळत नाहीं! नुकतीच थोड्या वेळापूर्वीं एक बाई येथें कापड घेण्याकरितां आली असतां यानें आपण होऊन कापडाला भोंक आहे म्हणून तिला सांगितलें; त्यामुळें तें कापड तसेंच राहून माझें नुकसान झालें. जिन्नस बरावाईट पाहून घेण्याचें काम गिऱ्हाइकाचें आहे. जर आम्ही व्यापारी आपणच होऊन त्यांतील खोडी त्यास दाखवूं लागलों, तर आमचा मूर्खपणा होईल!'

तेव्हां मुलाचा बाप म्हणतो, 'हँ हँ! एवढाच ना तर मग माझ्या मुलाचा दोष?' व्यापारी उत्तर करतो, 'होय, एवढाच काय

तो. बाकीची त्याची चालचलणूक चांगली आहे.' तेव्हां बाप म्हणतो, 'तर मग आपण हें वर्तमान मला कळविलें हें फार चांगलें केलें, व यासंबंधानें पहिल्यापेक्षांही तो माझ्या प्रीतीस अधिक पात्र झाला असून, इतःपर मी त्याला तुमचे येथें मुळींच ठेवूं इच्छीत नाहीं!'

---

## बंदुकीच्या दारूचें पीक.

सुमारें दीडशें वर्षांपूर्वी, उत्तरअमेरिकेंत मसुरी नदीच्या कांठच्या प्रदेशांत इंदियन म्हणजे तेथचे मूळचे राहणारे लोक, ह्यांची बरीच वस्ती होती. त्या वेळेपर्यंत त्या लोकांस बंदुकीच्या दारूची मुळींच माहिती नव्हती. तेव्हां कोणी युरोपियन व्यापारी तेथें गेला, व त्यानें त्यांस दारूचा उपयोग सांगून कित्येक बंदुकी व दारू त्यांना देऊन त्याजबद्दल त्यांजपासून लोंकर वगैरे घेतली.

नंतर पुढें कांहीं दिवसांनीं कोणी फ्रेंच व्यापारी तेथें दारू घेऊन गेला. परंतु त्या इंदियनांच्या जवळ दारूचा पुष्कळ सांठा असल्यामुळें ते ती घेईनात. तेव्हां त्यानें त्या बिचाऱ्यांस लुच्चेगिरीनें फसवून ती दारू त्यांस घ्यावयास लाविलें. त्यानें त्यांस सांगितलें कीं, 'दारू ही एक धान्याची जात असून ती जमिनींत पेरली असतां इतर धान्याप्रमाणें तिचें पुष्कळ पीक येतें.' त्या भोळ्या इंदियनांस ती गोष्ट खरी वाटून त्यांनीं आपल्याजवळची सर्व दारू शेतांत पेरली, आणि सांठ्याकरितां त्याच्याजवळची विकत घेऊन तिजबद्दल त्यास कातडीं व लोंकर दिली.

मग त्या इंदियनांनीं शेतावर राखण ठेविली, आणि दारू आज उगवेल, उद्यां उगवेल, म्हणून ते वाट पहात राहिले. परंतु बरेच दिवस गेले तरी ती उगवण्याचें कांहींच चिन्ह जेव्हां त्यांना दिसेना तेव्हां त्या व्यापाऱ्यानें आपणांस उगीच थाप तर दिली नाहींना;

असा त्यास अंदेशा येऊं लागला; व शेवटीं सगळा हंगाम निघून गेला तरी दारूच्या पिकाचा कोठेंही मागमूस लागत नाहीं, असें जेव्हां त्यांस आढळून आलें, तेव्हां त्याच्या लबाडीविषयीं त्यांची पक्की खात्री झाली.

पुढें कांहीं दिवसांनीं त्या फ्रेंच मनुष्यास पुनः त्या देशांत व्यापाराकरितां जाण्याची इच्छा झाली. परंतु त्याला आपलें काळें तोंड घेऊन स्वतः जाण्याची छाती होईना, सबब त्यानें आपला एक भागीदार, दुसरे कांहीं जिन्नस बरोबर देऊन पाठविला. तेव्हां पूर्वींच्या त्या लबाड मनुष्याचा व याचा कांहीं संबंध असावा असें जरी त्या इंदियनांस समजण्यास साधन नव्हतें, तरी सहजगतीनें तो संबंध त्यांना कळून आला. परंतु त्यांनीं त्याच्या भागीदाराच्या बिलंदरपणाची त्यास यत्किंचित्‌ही ओळख न देतां, त्याला बिऱ्हाडाकरितां व माल ठेवण्याकरितां गांवाच्या मध्यभागीं असलेली सार्वजनिक जागा दिली. मग त्यानें आपले जिन्नस विक्रीकरितां मांडले असतां, ते सर्व इंदयन लोक तेथें जमा झाले, व डोळ्याचें पातें लवतें न लवतें तों त्यांनीं त्याचा एकूणएक जिन्नस तेथून पळविला. त्यावरून त्या व्यापाऱ्यानें मोठा गवगवा केला, व आपली दाद लावण्याकरितां तो त्या लोकांच्या नायकाकडे गेला. त्यानें त्यास गंभीरपणानें सांगितलें कीं, ' तुमच्यावर ह्या लोकांनीं ही जी आगळिक केली आहे, तिजमुळें झालेलें तुमचें नुकसान तुम्हांला भरून मिळणें रास्त आहे; परंतु हें होण्याला तुम्हांला कांहीं दिवस थांबलें पाहिजे; कां कीं, आम्हांस तुमच्याच एका देशबांधवानें दारू पेरण्यास सांगितल्यावरून आम्हीं ती पेरली आहे, तिचें जेव्हां पीक येईल तेव्हां आमचा हा सगळा गांव शिकारीला जाईल, व त्यावेळीं जीं कातडीं वगैरे मिळतील तीं तुमच्या ह्या नुकसानीबद्दल व तुमच्या देशबांधवानें आम्हांस दारू पेरण्यास उत्कृष्ट मार्ग दाख-

विला त्याबद्दल, आम्ही तुम्हांस देऊं.' हें ऐकून तो मनुष्य फार खिन्न झाला. परंतु आपल्या भागीदाराचा हरामखोरपणा झांकून आपलें काम करून घेण्याकरितां त्यानें त्यांच्याहूनही एक सवाई युक्ति काढिली ! तो त्यांस म्हणाला, 'दारू आमच्या देशांत पिकते खरी, पण तुमच्या ह्या देशाच्या जमिनींत तिचें पीक व्हावयाचें नाहीं. याकरितां तिची वाट पाहण्यांत मुळींच अर्थ नाहीं.' तथापि त्याच्या बोलण्याकडे कोणींही लक्ष दिलें नाहीं, व त्याला लज्जित होऊन हात हालवीत परत जाण्याखेरीज दुसरा मार्गच राहिला नाहीं ! त्या फ्रेंच मनुष्याच्या लबाडीचा परिणाम एवढाच होऊन राहिला नाहीं, तर यापुढें कोणीही फ्रेंचांशीं म्हणून व्यवहार करावयाचा नाहीं असा त्यांनीं आपसांत ठराव करून टाकिला, व ह्यामुळें पुष्कळ फ्रेंच व्यापाऱ्यांचें नुकसान झालें.

## मोझेस राथचाइल्ड.

इसवी सनाच्या अठराव्या शतकांत फ्रान्स व जर्मनी ह्या देशांमध्यें लढाई चालली असतां फ्रेंच लोक जेव्हां जर्मनीवर चाल करून गेले, तेव्हां हेसी क्यासल नामक संस्थानच्या मांडलिक राजास आपलें संस्थान सोडून पळून जाण्याची पाळी आली. तो फ्रांकफोर्ट शहरावरून चालला असतां, मोझेस राथचाइल्ड ह्या नांवाचा कोणीएक पेढीवाला तेथें होता, त्यास त्यानें आपल्याजवळचा पुष्कळ पैसा व मौल्यवान् जवाहीर अमानत ठेऊन घेण्याविषयीं विनंती केली. कारण असें न केलें तर हा ऐवज शत्रूंच्या हातीं लागण्याचा संभव आहे असें त्यास वाटलें. परंतु अशा धामधुमीच्या वेळीं येवढी जबाबदारी घेण्यास कोण तयार होतो ? तथापि राजाचा फारच आग्रह पडल्यावरून मोझेस यानें त्याचें म्हणणें कबूल केलें. तरी पण असल्या बिकट प्रसंगीं ऐवज सुरक्षित राहण्याची मोठी पंचाईत आहे असें लक्ष्यांत आणून, तो गेला असतां

कायदेशीर रीतीनें आपणावर जबाबदारी नसावी म्हणून मोझेस यानें राजाला पावती मात्र दिली नाहीं.

तो पैसा व तें जवाहीर मिळून कित्येक लाखांची मत्ता होती. परंतु फ्रेंच लोक फ्रांकफोर्ट शहरावर हल्ला करण्यास येण्याच्या पूर्वींच मोझेस यानें मोठ्या काळजीनें व पराकाष्ठेची मेहनत करून तो सगळा ऐवज, कोणाला न कळवितां घराजवळच्या आपल्या बागेच्या एका कोपऱ्यांत पुरून टाकिला. मग त्यानें असें केलें कीं, आपला स्वतःचा जो थोडासा पैसा होता, तो मुद्दाम लपवून ठेविला नाहीं; कारण येवढ्यावरच जाऊन राजाचें द्रव्य सुरक्षित राहिलें म्हणजे आपण मोठी मिळवली, असा त्यानें विचार केला. फ्रेंचांनीं लुटीच्या वेळीं मोझेस याचा सर्व पैसा नेला. तो वर सांगितल्या-प्रमाणें छपवून ठेवण्याचा यत्न मोझेस यानें न केल्यामुळें, ते लोक तेवढाच घेऊन गेले, व राजाचें द्रव्य सुरक्षित राहिलें. वर सांगि-तल्याप्रमाणें न करतां जर मोझेस हा आपल्याजवळचा पैसा आड करून ठेविता, तर शत्रूंनीं त्याचें घरदार खणून काढिलें असतें, व मग सारेंच द्रव्य नेलें असतें यांत संशय नाहीं; कारण याप्रमाणें दुसरीं कित्येक उदाहरणें घडलीं. असो; फ्रेंच लोक निघून गेल्यावर मोझेस यानें राजाचें द्रव्य पुरून ठेविलें होतें त्यांपैकीं थोडेंसें काढून घेतलें, व तो आपल्या व्यापाराच्या कामास त्याचा उपयोग करूं लागला. त्याचा व्यापार फिरून लवकरच भरभराटीस आला, व त्यास चांगली कमाई आली.

नंतर कांहीं वर्षांनीं लढाई बंद होऊन जिकडे तिकडे शांतता झाल्यावर हेसी—क्यासलचा राजा आपल्या संस्थानास परत आला. येतांना तो फ्रांकफोर्ट शहरीं आला, परंतु आपलें द्रव्य मिळण्याची त्यास फारशी आशा नव्हती; कारण तो मनांत म्हणाला, बहुधा तें फ्रेंचांनीं लुटून नेलें असेल; आणि नेलें

नसलें तरी, मोझेस हा तें नेलें अशी खोटी सबब सांगून आपला लळीराम गार करील. परंतु मोझेस यानें आपण होऊनच राजाकडे जाऊन त्यास सांगितलें कीं, ' आपला सर्व ऐवज सुरक्षित असून तो आपला आपण घेऊन जावा. खेरीज आपल्या नक्त पैशापैकीं थोडीशी रक्कम मीं कांहीं दिवस वापरली आहे, तिजबद्दल शेंकडा पांच टक्केप्रमाणें व्याज देण्यासही मी तयार आहें. हा पैसा तरी वापरण्यास मला असें कारण झालें कीं, आपलें द्रव्य जतन करण्याकरितां मला स्वतःचा पैसा शत्रूंच्या भरीस घालावा लागला; तेव्हां मला कांहीं दिवस आपल्यापैकीं थोडासा घेतल्यावांचून गत्यंतर नव्हतें. '

राथचाइल्ड याचा हा अलौकिक प्रामाणिकपणा पाहून राजास पराकाष्ठेचा संतोष झाला, व त्यानें त्याजकडचा पैसा परत न घेतां तो हलक्या व्याजावर तसाच त्याजकडे राहूं दिला. नंतर राजानें त्याच्या उपकाराबद्दल उतराई होण्यासाठीं कित्येक युरोपियन राजांकडे त्याची शिफारस केली. त्यावरून त्यांनीं त्यास राजकीय कामांकरितां पैसा उभारण्याचीं मोठमोठीं कामें सांगितलीं, व त्यांत त्यास अतोनात किफायत झाली. शेवटीं त्याचा पसारा इतका वाढला कीं, त्याला आपले तीन मुलगे लंडन, पारिस व व्हिएन्ना येथें ठेवून अडतीचीं दुकानें स्थापन करावीं लागलीं. तीं फार उत्तम प्रकारें चालून मोझेस याचें घराणें जगांत अत्यंत प्रामाणिक व श्रीमान् म्हणून प्रसिद्धीस आलें.

---

## प्रामाणिकपणा.

### वचन पाळण्याविषयीं.

जो कोणी दुसऱ्या मनुष्यास कांहीं गोष्टीसंबंधानें वचन देतो, त्या वचन देणाऱ्याकडून बोलल्याप्रमाणें कृति होण्यांत त्या दुसऱ्या

मनुष्याच्या हिताहिताचा बहुधा संबंध असतो; व ज्यानें वचन दिलें असतें, त्यावर भरंवसा ठेवून त्याप्रमाणें तो आपल्या कामांची व्यवस्था ठेवितो. तेव्हां वचन देणाऱ्यानें आपला शब्द पाळला नाहीं; तर त्याची मोठी निराशा होते एवढेंच नाहीं, तर प्रसंगविशेषीं मोठें नुकसानही होण्याचा संभव असतो.

मनुष्य लहान अगर मोठा कसाही असो, त्यानें आपल्या शब्दाप्रमाणें कृति करण्याविषयीं फार खबरदारी घेतली पाहिजे. आतां कित्येक लहानसान गोष्टींच्या संबंधानें आपण बोलल्याप्रमाणें कृति न केल्यास त्यांत नुकसान होण्याचा संभव नसला, तरी तसें करणेंही गैरवाजवी असून त्यापासून पुढें आपलें नुकसान होतें; कारण अशा प्रकारें वचन पाळण्याच्या संबंधानें हेळसांड करण्याची एकदां संवय लागली म्हणजे पुढें मोठमोठ्या कामांतही मनुष्याच्या हातून तसेंच हलगरजीपणाचें वर्तन होतें, व त्यामुळें त्याची चार-चौघांत नापत होऊन तो अगदीं नादान ठरून जातो. याकरितां कोणतेंही वचन देण्यापूर्वीं चांगला पोक्त विचार करावा, व वाटेल तर तें द्यावें किंवा देऊं नये; पण एकदां दिलें म्हणजे मग कांहीं झालें तरी तें पाळण्यांत अगदीं कसूर न करणें हेंच थोरवीचें लक्षण आहे.

## मूर व स्पानिअर्ड.

कित्येक शतकांपूर्वीं आफ्रिकेंतील मूर, म्हणजे मोरोक्को देशचे लोक, यांनीं स्पेनचा थोडासा भाग बळकाविला असतां, एका स्पानिअर्डानें म्हणजे स्पेनच्या मनुष्यानें, कांहीं भांडणावरून एका तरुण मूराचा रागाच्या आवेशांत खून केला. तेव्हां आपल्याला आतां पकडतील म्हणून तो लागलाच तेथून पळाला, व एका बागेंत शिरला. त्या बागेचा मालक मूरच होता, तरी त्यास, त्यानें, आपणास लपवून आपलें रक्षण करण्याविषयीं विनंती केली.

मूरानें ती गोष्ट कबूल केली, व त्या स्पानिअर्डाची खात्री होण्या- करितां त्याला एक फळ खावयास दिलें. कारण मूर लोकांची अशी चाल आहे कीं, ज्यानें आपले येथें एकदां कांहीं खाल्लें, त्याला कधींही अंतर द्यावयाचें नाहीं. असो; नंतर मूरानें त्या स्पानिअर्डास बागेंतील झोंपडींत लपवून बाहेरून कुलूप लावून घेतलें आणि सांगितलें कीं, अंधार पडतांच तुला मी येथून दुसरीकडे ज्यास्त सुरक्षित जागीं पाठविण्याची तजवीज करीन.' असें म्हणून तो मूर आपल्या घरीं गेला. इतक्यांत कित्येक लोक रडत ओरडत त्याच्या मुलाचें प्रेत घेऊन आले व त्यास म्हणाले, 'एका स्पानिअर्डानें याचा खून केला!' तेव्हां विचार करतां त्यास आढळून आलें कीं, ज्यास आपण बागेंत थारा देऊन अभय दिलें, तोच हा खून कर- णारा स्पानिअर्ड होय. त्यावरून त्याला फार वाईट वाटलें. पण आपण वचन दिलें तें दिलें, असें मनांत म्हणून त्यानें त्या मंडळीस त्या गोष्टीची कांहींएक ओळख दिली नाहीं. नंतर संध्याकाळीं तो फिरून बागेंत गेला, आणि आपल्या एका अतिशय चपळ घोड्या- वर त्या स्पानिअर्डास बसवून म्हणाला, 'अरे ख्रिस्ती मनुष्या! तूं प्रत्यक्ष माझ्या मुलाचा खून केला आहेस त्याअर्थीं मजकडून तुला शिक्षा मिळणें रास्त आहे. परंतु मी तुला अभय देऊन चुकलों आहें, तर तो आपला शब्द मोडण्याइतका नीचपणा माझ्या हातून होणार नाहीं. आतां तूं इतकेंच कर कीं, रात्रीच्या रात्रीं येथून निघून होईल तितकी दौड करीत जा, म्हणजे उजाडण्यापूर्वीं तूं कोठें तरी सुरक्षित स्थळीं पोहोंचशील. तूं जरी माझ्या मुलाचा प्राण घेतला आहेस, तरी तुझा घेण्यास मी कारणीभूत झालों नाहीं, ही गोष्ट ज्याच्या प्रसादानें घडली, त्या सर्वशक्तिमान् परमेश्वराचे मी फार आभार मानतों!'

---

## फ्रान्स देशाचा राजा जॉन्.

इंग्लंडचा राजा तिसरा एडवर्ड याच्या कारकीर्दींत इंग्लंड व फ्रान्स ह्यांच्यामध्यें युद्ध चाललें असतां, पॉइटीअर्स* येथील लढाईंत एडवर्ड ब्ल्याक प्रिन्सऽ ह्या नांवाच्या एडवर्ड राजाच्या ज्येष्ठ पुत्रानें फ्रान्सच्या जॉन् राजाचा पराभव केला, व त्यास बंदीवान करून इंग्लंडास नेलें. तो इंग्लंडास चार वर्षें राहिल्यावर इंग्लंडच्या राजानें, आपण योजलेल्या तहाच्या अटी जॉन् राजानें आपल्या प्रजेकडून कबूल करण्याचा यत्न करावा म्हणून त्यास परत स्वदेशास जाण्यास परवानगी दिली. परंतु तह न झाल्यास मी इंग्लंडास परत येईन असें त्यानें त्याजकडून वचन घेतलें. तहाच्या अटी होत्या त्यांत एक अशी होती कीं, फ्रान्सच्या राजाच्या सुटकेबद्दल फ्रेंच लोकांनीं खंडणीदाखल चाळीस लक्ष क्राऊन म्हणजे सुमारें एक कोट रुपये इंग्लंडच्या राजास द्यावे.

असो; जॉन् राजा इंग्लंडाहून निघून आपल्या देशांत गेला, परंतु त्याच्या सुटकेबद्दल वरील रक्कम देण्याचें फ्रेंच लोकांनीं नाकारल्यामुळें, तह होण्यास मार्ग राहिला नाहीं. त्या प्रसंगीं दुसरा कोणी असता तर तो खचीत पुनः कैदेंत राहण्यास परत गेला नसता. पण जॉन् राजाच्या स्वप्नांतही तसें करण्याचें आलें नाहीं! तो मुकाट्यानें लागलाच निघून इंग्लंडास आला व इंग्लंडच्या राजाच्या स्वाधीन होऊन मरेपर्यंत बंदींत राहिला. फ्रान्स देशाहून निघण्याचे वेळीं कित्येक फ्रेंच राजकारणी पुरुषांनीं त्याला उलट मसलत दिली, तेव्हां त्यानें असें दिलदारपणाचें उत्तर केलें कीं, 'प्रामाणिकपणा हा

---

*हें शहर फ्रान्स देशांत असून वरील लढाई इसवी सन १३५६ त झाली.

ऽ 'ब्ल्याक प्रिन्स' याचा अर्थ काळा राजपुत्र. हें नांव त्या राजपुत्रास त्याच्या काळ्या रंगाच्या चिलखतावरून पडलें होतें.

जगांतील इतर सर्व लोकांच्या आंगचा नाहींसा झाला, तथापि राजांच्या ठायीं तरी तो वास करीत असला पाहिजे ! '

---

## प्रामाणिकपणा.

### कर्ज वारण्याविषयीं.

पुष्कळ वेळां व्यापारासंबंधानें व संसारांतील अडचणींच्या संबंधानें लोकांस कर्ज काढण्याचा प्रसंग येतो. सावकार हा कोणाही मनुष्यास त्याची पत असल्याखेरीज कर्ज देत नाहींच; पण सावकारानें जरी फारशी चौकशी केली नाहीं, तरी कुळानेंही आपणास कर्ज फेडण्याची ऐपत आहे किंवा नाहीं याचा विचार करून मग तें घ्यावें; ऐपत नसेल तर कदापि घेऊं नये; कारण घेतल्यास तें त्याजकडून फिटलें जाण्याचा अर्थात् संभव नसतो, व तसें झालें म्हणजे कुळानें सावकाराच्या पैशाचा अभिलाष केला असें होतें इतकेंच नाहीं, तर उघड उघड त्याच्या घरावर दरोडा घातला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

जो प्रामाणिक मनुष्य आहे, तो आपला नाइलाज असेल तेव्हांच कर्ज काढितो, व तें फिटण्याची मुळींच शंका नसली तर काढितो, एरव्हीं कधींही काढीत नाहीं. त्यानें कर्ज काढिलें असतां त्याच्या मनांत रात्रंदिवस त्याविषयीं जागृति असते, व आपण त्यांतून कधीं एकदा मुक्त होऊं तो सुदिन असें तो मनांत म्हणत असतो. तथापि मनुष्याच्या इच्छेप्रमाणें व संभवाप्रमाणें नेहमीं गोष्टी घडतात असें नाहीं. एकादे वेळेस त्याजवर अकस्मात् कांहीं घाला पडतो, व त्याचें सर्वस्व जाऊन तो अगदीं दीन होऊन जातो. इतकें झालें तरी दुसऱ्याचे देण्यासंबंधानें तो इतर सर्व गोष्टींपेक्षां जास्त काळजी बाळगीत असतो, व रात्रंदिवस श्रम करून तें फेडण्याचा यत्न करितो.

तसेंच केव्हां केव्हां असेंही होतें कीं, व्यापारांत एकादी ठोकर लागली म्हणजे व्यापाऱ्यास आपलें कर्ज वारण्याची शक्ति नाहींशी होते, व त्या प्रसंगीं तो आपल्या सर्व सावकारांस बोलावून आपल्याजवळ जें काय असेल तें दामाशाईप्रमाणें त्यांस वांटून देतो, व तेही बहुधा निरुपायास्तव त्याला सर्व रकमेची सोडचिठी देतात. कायद्याप्रमाणें अशा प्रकारें जरी तो मनुष्य कर्जमुक्त झाला, तरी तो जर प्रामाणिक असेल तर त्याला सामर्थ्य आलें म्हणजे सावकारांच्या सर्व रकमांचीं त्यानें फेड करावी हें रास्त आहे. पण अशा प्रकारें कर्जाची फेड करण्याचें सामर्थ्य थोडक्याच लोकांना येतें, व आलें तरी अशी कृति करणारे फारच विरळा. तेव्हां याप्रमाणें आजपर्यंत ज्यांनी केलें आहे, ते खरोखर स्तुतीस पात्र आहेत.

## डेन्हम् याची गोष्ट.

इंग्लंडांतील ब्रिस्टल् शहरीं डेन्हम् या नांवाचा कोणी व्यापारी होता. त्याला व्यापारांत बूड आल्यामुळें त्यानें आपल्या सावकारांस दामाशाईप्रमाणें पैसा चुकवून दिला, व तो अमेरिकेंत निघून गेला. परंतु पुढें कर्मधर्मसंयोगानें तेथें त्यास व्यापारांत यश आलें, आणि तो थोडक्याच वर्षांत पुनः मोठा धनाढ्य व्यापारी बनला. तेव्हां तो इंग्लंडास परत आला, व एके दिवशीं आपल्या पूर्वीच्या सर्व सावकारांस त्यानें मेजवानी दिली. त्यावेळीं त्यांनीं आपलें कर्ज थोडक्यांत वारून घेण्याची पूर्वी मेहेरबानी केली होती तिजबद्दल त्यानें त्यांचे फार आभार मानिले. पण त्या जमलेल्या सावकारांस त्या प्रसंगीं मेजवानी व आभार यांखेरीज दुसरें कांहींएक त्याजकडून मिळण्याचा अर्थातच संभव नव्हता. तथापि त्यांस अत्यंत आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट अशी झाली कीं, त्यांना जेवण्याच्या मेजावरील ताटांत वाढिलेले पदार्थ खाल्ल्यावर नोकरांनीं जेव्हां ताटें उचलिलीं, तेव्हां त्या प्रत्येकजणास ताटाखालीं त्याची राहिलेली रक्कम व्याजासुद्धां

मिळविण्याविषयीं हुंडीचिठी ठेविलेली आढळली! हें पाहून त्या सर्व मंडळीस केवढा आनंद झाला असेल, व डेन्हम् ह्याच्या प्रामाणिकपणाविषयीं त्यांचा किती उत्तम ग्रह झाला असेल, ह्याचा वाचकांनींच विचार करावा!

---

## मार्किस ऑफ वेलस्ली.

हिंदुस्थानचा प्रसिद्ध गव्हर्नर जनरल लॉर्ड वेलस्ली ह्याचा बाप मरण पावला त्यावेळीं त्यास अतिशय कर्ज होतें. तिकडील कायद्याप्रमाणें त्याचा मुलगा लॉर्ड वेलस्ली हा जरी त्याच्या मालमत्तेचा वारस झाला, तरी बापाच्या कर्जाची त्याजवर जबाबदारी नव्हती. तथापि लॉर्ड वेलस्ली हा मोठा प्रामाणिक व करारी स्वभावाचा असल्यामुळें, सर्व कर्ज वारल्याखेरीज बापाच्या मालमत्तेचा फारसा उपभोग घ्यावयाचा नाहीं, असा त्यानें निश्चय केला. मग कांहीं वर्षेंपर्यंत त्यानें मोठ्या काटकसरीनें खर्च करून पुष्कळ पैसा सांचविला, आणि आपल्या बापाचें कर्ज पैन् पै वारून टाकिलें.

लॉर्ड वेलस्ली ह्याच्या सावकारांपैकीं एकानें त्याजकडे दीडशें पौंडांची मागणी केली. तेव्हां त्यानें त्या मनुष्याजवळचे कागदपत्र तपासून पाहतां त्याला असें दिसून आलें कीं, हें कर्ज मूळचें दुसऱ्याच कोणा एका मनुष्याचें आपल्या बापाकडे असून, त्यानें या मनुष्यास कांहीं अडचणीमुळें पन्नास पौन्डांस रोखा वेचन करून दिलेला आहे. तेव्हां वेलस्लीनें त्यास सांगितलें कीं, ‘ तुझें वाजवी देणें आहे तेवढें मी तुला देईन, पण ज्यास्त एक छदामही देणार नाहीं. तूं आपले हे पन्नास पौंड, व तुजजवळ हें खत होतें तेवढ्या मुदतीचें व्याज घे. ह्याहून अधिक कांहीं तुला मिळणार नाहीं. ’ त्या सावकारानें, आपल्याला कायदेशीर रीतीनें अधिक कांहीं मागण्याचा हक्क नाहीं असें पाहून ती रक्कम घेतली, व रोखा परत दिला. परंतु

वेलस्ली हा एवढेंच करून राहिला असें नाहीं. त्यानें मूळ सावकाराचा शोध लाविला, व त्यास व्याजासुद्धां सर्व रक्कम पोहोंचती केली!

## संतोषप्रशंसा.

श्लोक.

न देतां मुळीं ताप अन्या जनांसी
न घेतां तशी नम्रता दुर्जनांशीं
धरोनी सदा साधुची रीति खाशी
मिळे अल्प जें ती खरी द्रव्यराशी! १

वारा पिती तरि न दुर्बळ सर्प होती
खाती सुकें तृण तरी बलवंत दंती
भक्षोनि काल मुनि काढिति झाडपाला
संतोष हेंच सुखसाधन मानवाला! २

तृष्णा हे मदिरा पितां जन हिला निःशंक वेडावती
कर्माकर्म न जाणतां अमुनियां श्वानस्थिती पावती
संतोषामृतपान सुज्ञ करिती ते स्वस्थचित्तें महा
सौख्या भोगुनि देवसे मिरवती खोटें खरें कीं पहा! ३

मातेच्या उदरीं न हस्त न तसे होते मला पाय कीं
होतों केवळ मांसगोलक तिथें सांभाळिलें कौतुकीं
तो विश्वंभर हें पटुत्व सकलीं देवोनियां इंद्रियीं
मातें मारिल कासयास्तव बसूं मी या वृथा संशयीं! ४

देहीं आरोग्य विद्या विपुल अनुपमा संगती सज्जनांची

---

१ हत्ती. २ दारू. ३ चांगलें वाईट कृत्य. ४ कुत्र्याची अवस्था. ५ मांसाचा गोळा. ६ पूर्णत्व. ७ कशाकरितां.

उत्पत्ती थोर गोत्रीं अथुनि अनुदिनीं वृत्ति होतीं जयाची
त्यापाशीं द्रव्य हो वा किमपिहि न वसो भाग्यशाली खरा तो
कीं संतोषीं तयाचा सुरसमें सगळा या जगीं काल जातो. ५

न बोलाविता दुःख येतें घराला
नव्हे सौख्य यत्नीं महा मानवाला
उगा काळजी कासया ती करावी
मनीं नित्य संतोषवृत्ती धरावी ! ६

---

## सत्य.

प्रत्येक मनुष्यानें हरएक प्रसंगीं सत्याचें अवलंबन करून चालणें हें फार महत्त्वाचें आहे. त्यापासून त्यास जगांत मोठी योग्यता प्राप्त होऊन एकंदरीनें त्याचें सर्व प्रकारें हित होतें. आपल्या हातून सत्याचें उल्लंघन न व्हावें म्हणून आजपर्यंत शेंकडों थोर लोकांनीं नानाप्रकारचीं संकटें भोगिलीं आहेत. प्रत्यक्ष श्रीरामचंद्रजींनीं व पांडवांनीं त्याकरितां वनवास भोगिला, हरिश्चंद्र राजानें आपलें राज्य दान केलें व आपणांस विकूनही घेतलें, इत्यादि गोष्टी सर्वांस माहीत आहेत. सत्याचा महिमा किती म्हणून सांगावा ! मुक्तेश्वर कवीनें म्हटलें आहेः—

सत्यापरता नाहीं धर्म । सत्य तेंचि परब्रह्म
सत्यापाशीं पुरुषोत्तम । सर्वकाळ तिष्ठत ॥ १ ॥
असत्य तेंचि पैं पातक । असत्य तोचि महानरक ॥
असत्याचेनि संगें दुःख । अनंत जन्म भोगिती ॥ २ ॥
सत्यामृताची कनकवाटी । जोडिली न सांडें भूतटीं ॥

---

८ सदोदित. ९ चरितार्थ. १० हातावर. ११ अथवा. १२ देवाकारखा. १३ होत नाहीं.

असत्य विषाची नरोटि । पवित्र हातें नातळें ॥ ३ ॥
सत्यसन्मार्गी वर्ततां नर । त्याचा कैवारी जगदीश्वर ॥
त्याचें कार्य सारंगधर । आपण अंगें संपादी ॥ ४ ॥
स्वप्नप्राय संसार क्षणिक । लटकीं सर्व साधनें एक ॥
सत्य स्वधर्म शुद्ध विवेक । साधूनि जाती जाणते ॥ ५ ॥

सत्यापासून मनुष्यास जेवढी योग्यता प्राप्त होते तितकीच असत्यापासून त्याची हानि होते. असत्य हें मनुष्याला स्वतःला जितकें अहितकारक आहे, तितकेंच पण दुसऱ्यालाही उपद्रव देणारें आहे. एकानें दुसऱ्याविरुद्ध खोटी साक्ष दिल्यामुळें त्याचा प्राणनाश झाला अशीं अनेक उदाहरणें इतिहासांत आढळतात. जगांत सर्वच खोटें बोलणारे असतील तर कोणालाही लेशभर देखील सुख मिळणार नाहीं; कां कीं, कोणाचा कोणावर भरंवसा म्हणून मुळींच बसावयाचा नाहीं. या गोष्टी लक्षांत ठेवून सर्वांनीं सत्य असेल तेंच सदोदीत बोलण्याची प्रतिज्ञा करावी व ती शेवटपर्यंत पाळावी, हें योग्य आहे.

असत्य बोलण्याचे अनेक प्रकार आहेत. ते सर्व जरी सारखे भयंकर नाहींत, तरी त्यांपैकीं कोणताही क्षम्य आहे असें समजूं नये. मुद्दाम कांहीं हेतु मनांत धरून असत्य बोलणें, याखेरीजही दुसरे कित्येक असत्य भाषणाचे प्रकार आहेत. ते तोंडपुजेपणा, उतावळेपणा इत्यादिकांपासून उत्पन्न होतात. एकाद्याला वाटतें कीं, दुसऱ्याला जें गोड वाटेल तें खरें नसलें तरी हरकत नाहीं, त्याच्या तोंडापुरतें तसें बोलावें. पण हें खरोखर नीच कृत्य होय. इतकेंच नाहीं, तर ह्यांत दुसऱ्याचा विश्वासघात केल्याचाही दोष आणखी पदरीं येतो. याचप्रमाणें विचार न करितां उतावळेपणानें बोलण्याचेंही आहे.

१ स्पर्शू नको.

कांहीं एकादी आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट सांगावयाची असली म्हणजे ती घाईघाईनें सांगितली असतां एकपट असली तर दसपट सांगण्यांत येते. या योगानें घटकाभर लोकांस आश्चर्य वाटतें व करमणूक होते खरी, परंतु पुढें वास्तविक प्रकार कळला म्हणजे त्या मनुष्याला ते ' थाप्या ' म्हणतात, व त्याजविषयीं नाक मुरडल्यावांचून रहात नाहींत.

एक मुलगा शाळेंतून घरीं येतांच बापास म्हणाला ' बाबा, बाबा ! अहो, राजवाड्याच्या पलीकडच्या पटांगणांत किती तरी हत्ती आले होते ! मला वाटतें, पांचशें किंवा अधिकही असतील ! ' बाप म्हणतो, ' काय म्हणतोस ? पांचशें ! अरे नीट विचार कर. इतके हत्ती त्या ठिकाणीं रहाण्याला जागा तरी आहे काय ?' मुलगा त्यावर म्हणतो, ' नाहीं; शंभर तरी खचीत होते. ' बाप म्हणतो, ' अजून नीट विचार कर, शंभरही कदाचित् नसतील ! ' मुलगा अंमळ घुटमळून म्हणतो, 'हो, शंभर कदाचित् नसतील, पण आतां मी तुम्हांला खचीत सांगतों कीं, ते पन्नासांपेक्षां कमी तर नव्हतेच!' बाप म्हणतो, ' आतां मला तुझें कांहींएक खरें वाटत नाहीं. तूं पांचशेंपासून पन्नासापर्यंत आलास, त्याअर्थीं माझा भरंवसा तुजवर बसावा कसा ?' सारांश, अशा प्रकारें अतिशयोक्ति करून बोलण्यापासून मनुष्य उपहासास पात्र होतो.

मुलांना वाटतें कीं, आपण क्षुल्लक कामांत खोटें बोललों असतां त्यांत काय नुकसान आहे ? पण ही त्यांची मोठी चूक आहे; कां कीं, एक तर हा अपराध आहे, व दुसरें असें कीं, एकदा लहानसहान गोष्टींत खोटें बोलण्याची संवय लागली म्हणजे तीच वृद्धिंगत होतां होतां पुढें हरएक प्रसंगीं मनुष्य खोटें बोलायाला लागतो. सत्याचें अवलंबन केल्यापासून केवढा लाभ होतो व असत्यापासून

कसें नुकसान होतें याचीं उदाहरणें पावलोपावली आपल्यांला आढळतात.

## वनदेव आणि लांकूडतोड्या.

[ कल्पित गोष्ट. ]

एक लांकूडतोड्या नदीचे कांठीं लांकडें तोडीत होता. त्याच्या हातची कुऱ्हाड निसटून नदींत पडली; व लागलीच तळाशीं गेली. हें पाहून त्याला अतिशय वाईट वाटलें, व तो दुःख करीत नदीच्या कांठीं बसला. इतक्यांत ज्या वनदेवाच्या ताब्यांत ती नदी होती, तो तिकडून सहज चालला असतां त्याला त्या मनुष्याची दया आली, व त्यानें त्यास त्याच्या दुःखाचें कारण विचारिलें. तें ऐकल्यावर देवानें नदींत बुडी मारली, व एक सोन्याची कुऱ्हाड बाहेर काढून त्यास म्हणाला, ' पहा हीच का तुझी कुऱ्हाड ? लांकूडतोड्या म्हणाला, ' ही नाहीं माझी. ' त्या वरून देवानें पुनः बुडी मारली, व एक रुप्याची कुऱ्हाड बाहेर काढली. तीही माझी नाहीं असें लांकूडतोड्यानें म्हटल्यावरून, देवानें तिसऱ्यानें बुडी मारून त्याची जी खरी कुऱ्हाड होती ती बाहेर काढिली. ती पाहून लांकूडतोड्यास मोठा आनंद होऊन तो म्हणतो, 'देवराज, हीच हो हीच माझी !' त्या मनुष्याचा प्रामाणिकपणा पाहून देव फार संतुष्ट झाला, व त्यानें त्यास बाकीच्या कुऱ्हाडीही बक्षीस दिल्या.

लांकूडतोड्यानें त्या कुऱ्हाडी घरीं आणल्यावर हें वर्तमान आपल्या शेजाऱ्यांस सांगितलें. तेव्हां त्यांपैकीं एकास वाटलें कीं, आपणही असेंच करावें म्हणजे आपलेंही नशीब कदाचित् उघडेल. मग तो त्याच नदीच्या कांठीं लांकडें तोडण्याकरितां म्हणून गेला, आणि त्यानें आपली कुऱ्हाड हातची मुद्दाम सोडून देऊन नदींत पडेल असें केलें, व बाह्यात्कारी मोठें दुःख करीत बसला. देव पहिल्याप्रमाणें तेथें प्राप्त झाला, व त्या मनुष्याच्या दुःखाचें कारण ऐकून त्यानें

नदींत बुडी मारली. नंतर एक सोन्याची कुऱ्हाड बाहेर काढून तो मनुष्यास म्हणाला, ' हीच का तुझी कुऱ्हाड ? ' तों तो मोठ्या उत्सुकतेनें म्हणतो, ' होय ! हीच हो हीच !' असें म्हणून तो देवाच्या हातून ती घेऊं लागला. तेव्हां देवानें त्याच्या लबाडीबद्दल त्यास शिक्षा करण्यासाठीं ती सोन्याची कुऱ्हाड दिली नाहीं इतकेंच नाहीं, तर त्याची पडली होती तीही पण काढून दिली नाहीं!

इसापनीति भाग १ ( नवीन भाषांतर ).

## रामा आणि सदू.

एका खेड्यांतील पाटलाचे रामा आणि सदू या नांवाचे दोन मुलगे होते. ते एके दिवशीं सकाळीं सुमारें आठ वाजतां परसांत खेळण्याच्या इरादानें चालले असतां रामा सदूस म्हणतो, ' गड्या, आपण आपला रत्न्या कुत्रा बरोबर घेऊं. ' सदू म्हणतो, ' खरेंच, तो असला म्हणजे आपल्याला पुष्कळ गंमत करावयास सांपडेल. ' त्याप्रमाणें ते दोघे मुलगे, रत्न्या हा घरांत चुलीपाशीं निजला होता त्यास उठवून नेण्याकरितां धांवत गेले.

घरांत बराच अंधार होता, यामुळें त्या मुलांच्या आईनें नुकत्याच गाईम्हशींच्या धारा काढून दुधाच्या चव्यीं भरून आणून तेथें ठेविलेल्या होत्या, त्या गर्दींमध्यें त्या मुलांच्या लक्ष्यांत न येऊन त्यांपैकीं एक चर्वी पालथी झाली. तें पाहून मुलांना फार वाईट वाटलें, व ते तसेच क्षणभर स्तब्ध राहिले. रामा म्हणतो, ' आतां आज आपल्याला भाकरीला दूध मिळण्याची पंचाईत आली यांत संशय नाहीं. ' सदू म्हणतो, ' कां ? पंचाईत काय म्हणून ? दुसरें दूध घरांत नाहीं कीं काय ? ' रामा म्हणतो, ' आहे, पण तें आपल्याला कसें मिळणार ? कां कीं, परवांच्या दिवशीं असेंच आपल्या हातून दूध सांडलें तेव्हां आपल्याला आईनें बजावून सांगितलें आहे कीं, पुनः असें झाल्यास तुम्हांला भाकरीला दूध मिळणार नाहीं. '

सदू म्हणतो, 'बरें, तर मग काय करावयाचें आहे ? आपण आजचा दिवस दूध मागूं नये, व पुनः तें अशा प्रकारें न सांडण्याविषयीं काळजी घ्यावी म्हणजे झालें. चल आतां आपण आईकडे जाऊन तिला हें कळवूं. कारण तिनें सांगून ठेविलें आहे कीं, जेव्हां तुमच्या हातून एकादी चूक होईल तेव्हां मला ताबडतोब येऊन कळवीत जा.' रामा म्हणतो, 'पण जरा थांबेनास ? एवढी घाई कां करतोस ?' तेव्हां सदू अंमळसा थांबून पुनः म्हणतो, 'हं, चल आतां, उगाच वेळ कशाला लावतोस ?' रामा उत्तर करितो, 'थांबेनास का जरा पण ! तुला मोठी घाई झाली आहे ! पण मला आई रागें भरेल याचें भय वाटतें. याकरितां इतक्यांत तिच्याकडे मला येववत नाहीं.' याप्रमाणें रामा जितका जितका घोटाळूं लागला तितका तितका त्याला आपला अपराध नाकबूल करण्याचा मोह पडूं लागला. शेवटीं त्यानें, आपण आईकडे जावयाचें नाहीं असें ठरविलें. हें पाहून सदू एकटाच निघून गेला.

इकडे रामा एकटाच घरांत असतां, आपला अपराध छपविण्याला काय युक्ति योजावी याबद्दल विचार करूं लागला. तो मनांत म्हणाला, 'जर मी व सदू दोघेही म्हणालों कीं, दूध आम्हीं कांहीं पालथें केलें नाहीं, तर आईला तें खरें वाटेल, व आपल्याला दूध मिळण्याची पंचाईत पडणार नाहीं; मात्र सदू अजून आईला भेटला नसला म्हणजे झालें.' याप्रमाणें त्याचे विचार चालले आहेत इतक्यांत आई घरांत येत आहे असें त्यानें पाहिलें. तेव्हां तो मनांत म्हणाला, 'बरें झालें, अजून कांहीं सदूची व आईची गांठ पडली नसेल, म्हणून मला वाटेल तसें आईला सांगण्यास मुळींच हरकत नाहीं.'

आई घरांत येतांच तिनें जेव्हां दूध सांडलेलें पाहिलें, तेव्हां ती फार संतापली आणि म्हणाली, 'हॅं, झालें दूध एकदांचें पालथें !

—कोण मेला हा त्रास ! कायरे राम्या ? कोणाचें हें काम ? रामा हळूच म्हणतो, ' आई, मला कांहीं ठाऊक नाहीं. ' आई दरडावून म्हणते, ' ठाऊक नाहीं काय ? खोटें बोलूं नको, असेल तें खरें सांग. खरें बोललास तर मी तुला रागें भरणार नाहीं; फार काय, पण माझ्या सगळ्या चव्यांतलें दूध जरी पाळथें झालें तरी तें मला पुरवेल, पण खोटें बोलणें मला अगदीं पुरवणार नाहीं ! सांग तर राम्या, कोणीं ही चवी पालथी केली ती ? ' रामा गोरेंमोरें तोंड करून घुटमळत म्हणतो, ' ना-ना-नाहीं. मीं कांहीं ती पा-पा-पालथी मुळींच केली नाहीं. ' आई म्हणते, ' मग सद्या कोठें आहे तो ? त्यानें केली काय ? ' रामा उत्तर करितो, ' नाहीं, त्यानेंही नाहीं. ' कारण त्याला आशा होती कीं, सदू आला म्हणजे तोही नाकबूल जाईल असें आपल्याला करतां येईल. आई म्हणते, ' सद्यानें चवी पालथी केली नाहीं हें तूं कशावरून म्हणतोस ? ' हें आईच्या तोंडचे शब्द ऐकून रामा घोटाळ्यांत पडला, व त्याला काय उत्तर द्यावें तें सुचेना. मग अंमळशानें म्हणतो, ' क-क-कशावरून म्हणजे ? ए-ए-एकसारखा केव्हांचा मी येथें आहेंच कीं नाहीं ! ' आई म्हणते, ' तर मग चवी कोणीं पालथी केली हें तुला ठाऊक असलेंच पाहिजे ! ' तेव्हां रामा अंमळ विचार केल्यासारखें करून म्हणतो, ' मला वाटतें हें त्या रत्न्याचें काम असावें. ' आई म्हणते, ' असावेंबिसावें मला कांहीं समजत नाहीं. तूं स्वतः त्याला पाहिलेंस काय ? ' रामा उत्तर करतो, ' होय, मीं स्वतः पाहिलें ' तेव्हां आई संतापून म्हणते, ' तर मग मला त्याची चांगली खोड काढली पाहिजे ! जा तर परसांतून एक चिंचेचा फोंक घेऊन ये. ' रामा फोंक आणण्याकरितां परसांत चालला असतां त्याला सदू भेटला. तेव्हां त्यानें सदूस थांबवून घाईघाईनें झालेला सर्व वृत्तांत सांगितला; आणि त्यास म्हणाला, ' तूं मात्र आतां एवढेंच कर कीं, माझ्या

प्रमाणें हुबेहुब आईला सांगून दे म्हणजे झालें.' सदू म्हणतो, 'छे बुवा, मी नाहीं तसें करणार ! काय ? आपल्याबद्दल उगी-च्याच्या उगीच रत्न्याला मार खावयास लावावयाचें ? वाहवा ! हें अगदीं बरोबर नाहीं !' असें म्हणून सदू घरांत आईकडे चालला. पण रामा जलदी करून फोंक तोडून घेऊन आधीं घरांत गेला, व सदूस आंत येतां येऊं नये म्हणून त्यानें दार लावून घेतलें. नंतर त्यानें आईपाशीं ती छडी दिली. ती तिनें रत्न्यावर उगारतांच त्या बिचाऱ्याची अगदीं गाळण होऊन गेली ! इतक्यांत सदू दाराशीं मोठ्यानें ओरडतो आहे असें आईनें ऐकिलें. तो तेथूनच घाईघाईनें म्हणतो, 'अग आई, थांब थांब, रत्न्याचा कांहींएक अपराध नाहीं. माझ्या व रामाच्या हातून दूध पालथें झालें आहे.' इतकें होत आहे तों त्या मुलांचा बाप तेथें आला, व 'दार उघडा—दार उघडा !' असें म्हणूं लागला. दार उघडल्यावर पाटील आंत जाऊन म्हाणतो, 'कायरे, ही सर्व गडबड कसली चालली आहे ?' त्यावरून त्याच्या बायकोनें सर्व वृत्तांत त्यास सांगितला. तो ऐकून घेऊन पाटलानें तिच्या हातचा चिंचेचा फोंक घेतला, व 'चल राम्या, समोर ये,' असें म्हणाला. हें पाहून रामाची पांचावर धारण बसली, व तो मोठ्यानें रडूं लागला. मग बापाच्या पायां पडून म्हणतो, 'एवढा वेळ मला क्षमा करा. मी पुनः कधीं खोटें बोलणार नाहीं.' पण बापानें त्याच्या बोलण्याकडे लक्ष न देतां त्याची गचांडी धरून त्यास उभें केलें आणि म्हटलें, 'होय, तूं पुनः खोटें बोलणार नाहीं असें म्हणतोस, पण तुला आजच्या अपराधाबद्दल या वेळेस चांगला खरपूस मार दिलाच पाहिजे !' असें म्हणून बापानें त्यास असा बेदम मार दिला कीं, त्याच्या रडण्याओरडण्याच्या योगानें, शेजारचे सर्व लोक काय झालें म्हणून पाहाण्याकरितां धांवून आले. मग बापानें रामास सोडून देऊन म्हटलें, 'नीघ येथून गुलामा,

आतां माझ्यासमोर काळें तोंड घेऊन उभा राहूं नको ! तुला आज दूध मिळणार नाहीं तें नाहींच, पण भाकरही मिळणार नाहीं ! खोटें बोलण्याचा परिणाम कसा होतो हें तुझ्या चांगलें लक्षांत राहिलें पाहिजे ! ' नंतर तो सदूकडे वळून म्हणतो, ' सदू ये इकडे, मला तुला पोटाशीं घेऊं दे. तुलाही आज ठरल्याप्रमाणें दूध मिळणार नाहीं, तथापि त्याबद्दल तूं कांहीं वाईट वाटूं देऊं नको. तूं खरें सांगितलें व तुला मार बसला नाहीं, आणि सर्व लोकांची मर्जी तुजवर प्रसन्न झाली आहे यांत सगळें आलें. पण मी एवढेंच म्हणून रहात नाहीं तर रत्न्या हा कुत्राही मीं आजपासून तुला दिला आहे. त्याला आज विनाकारण मार बसणार होता तो तूं वांचविलास, तेव्हां तूं त्याला चांगला धनी होशील अशी माझी खात्री आहे. मी उद्यां बाजारांत जाईन त्या वेळेस त्याला एक चांगला गळपट्टा घेऊन येईन. ' मग बायकोला उद्देशून म्हणतो, ' अग, उद्यां रत्न्याला गळपट्टा घातला म्हणजे शेजाऱ्यापाजाऱ्यांचीं मुलें तो पाहण्याकरितां येतील, तेव्हां तूं आज झालेली गोष्ट त्यांना सांग, म्हणजे खरें सांगणारा मुलगा आणि खोटें बोलणारा खराब पोर यांना त्यांच्या त्यांच्या कृतीप्रमाणें कसें फळ मिळतें हें त्या मुलांना चांगलें समजून येईल ! '

## पोकळ बढाईचा परिणाम.

अहमदाबादेस सुंदरशेट या नांवाचा कोणी व्यापारी रहात असे. त्याजवर कांहीं आकस्मिक प्रसंग गुदरून त्याचें दिवाळें निघालें. तेव्हां तो विरमगांव येथील आपल्या एका स्नेह्याच्या मदतीनें आपल्या देण्याची व्यवस्था लावण्याकरितां तेथें जाऊन राहिला. त्यानें बहुतेक व्यवस्था लाविली, व मोठ्या काटकसरीनें कांहीं दिवस काढल्यावर, त्याचा प्रामाणिकपणा जाणून मुंबई येथील मुळजीशेठ या नांवाच्या एका मोठ्या व्यापारानें त्याला आपला भागीदार कर-

ण्यांचें मनांत आणिलें. परंतु त्याच्या दोघां सावकारांच्या देण्याचा लढा मिटवावयाचा राहिला होता, तो मिटल्यावांचून त्याला मुंबईस जातां येईना. तथापि थोडे दिवसांत हा निकाल करून तुम्ही आलां तरी हरकत नाहीं, असें त्याला मुळजीशेटानें कळविलें.

सुंदरशेटाचा मुलगा अमदाबादेस शिकावयास राहिला होता. तो सुटीमध्यें बापाचे भेटीस जाण्याकरितां आगगाडींतून विरमगांवास चालला होता. तो बराच हुशार होता, परंतु पोकळ डौल मिरविण्याची त्याला फार हौस असे. त्याच्या डब्यांत दुसरे दोन गृहस्थ त्याच्या शेजारीं बसले होते. त्यांनीं सहज त्या मुलास तूं कोण, कोठला, वगैरे हकीकत विचारली. तेव्हां आपला बाप पूर्वी चांगल्या स्थितींत असून हल्लीं त्याच्या पदरीं गरिबी आली आहे, हें सांगणें त्याला बरोबर वाटलें नाहीं. त्यानें त्या गृहस्थांस सांगितलें कीं, 'माझा बाप चांगला सुखवस्तु असून त्यानें आपल्याजवळ पुष्कळ माया करून ठेविली आहे.' कर्मधर्मसंयोगानें असें झालें कीं, सुंदरशेटाच्या ज्या दोघां सावकारांच्या देण्याचा निकाल व्हावयाचा राहिला होता म्हणून मागें सांगितलें, तेच हे वरील दोन गृहस्थ होते, व सुंदरशेटानें सावकारांच्या तोंडाला पानें पुसण्याकरितां दिवाळें वाजविलें अशी त्यांची समजूत झालेली होती. तेव्हां त्याजविषयीं आणखी पुष्कळ माहिती त्यांनीं त्या मुलास विचारली. त्यावरून त्यानें आपल्या बापाच्या श्रीमंतीचें लटकेंच आणखी पुष्कळ वर्णन केलें. तेव्हां सुंदरशेटाच्या लबाडीबद्दल त्यांस संशय राहिला नाहीं. परंतु आणखी आपली पुरती खात्री करून घेण्याकरितां त्या मुलास खुबीनें त्यांनीं असें म्हटलें कीं, 'एकूण सुंदरशेट दिवाळें वाजवून गेला तरी तो कांहीं कफल्लक नाहीं—चांगला हात राखून आहे—नाहीं बरें!' दिवाळ्याची गोष्ट त्या मुलानें आपल्या बोलण्यांत अजीबात गाळली होती; पण आतां ती त्याला नाकबूल करितां येईना. व

आपल्या बापाच्या स्थितीबद्दल केलेलें वर्णन सर्व खोटें होतें असेंही म्हणतां येईना. यास्तव तो त्यांस म्हणाला, 'हो, तुम्ही म्हणतां असें तर खरें.' यावरून त्या दोघां गृहस्थांनीं सुंदरशेट याजकडे असलेल्या आपल्या कर्जाची तोड पाडण्याचें नाकारिलें इतकेंच नाहीं, तर त्यांनीं मुंबईस मुळजीशेटास पत्र लिहिलें व सुंदरशेटाच्या अप्रामाणिकपणाबद्दल त्या पत्रांत कडक टीका केली. तीमुळें मुळजीशेट याचा त्याजविषयीं अगदीं वाईट ग्रह होऊन गेला व त्याला त्यानें तत्काळ पत्रानें कळविलें कीं, 'तुमच्यापेक्षां दुसरा चांगला मनुष्य आम्हांला मिळाल्यामुळें आम्ही तुम्हांस आपले भागीदार करूं इच्छित नाहीं.'

याप्रमाणें त्या पोकळ बढाई मिरविणाऱ्या पोराच्या मूर्खपणामुळें त्याच्या बापाला आलेली सोन्यासारखी संधी फुकट गेली! मुळजीशेटाचें पत्र वाचून त्याला फार दुःख झालें, व तो आजारी पडला; तथापि आपल्या वर्तणुकीची निदान साफी तरी करून घ्यावी एवढ्याकरितां त्यानें मुंबईस ताबडतोब जाण्याचा निश्चय केला. पण अमदाबादेपर्यंत आल्यावर तो इतका थकून गेला कीं, त्याच्यानें पुढें येववेना. सबब तेथेंच तो एका स्नेह्याच्या घरीं राहिला. इकडे त्याच स्नेह्याच्या घरीं मुळजीशेट यास जाण्याचें कांहीं काम पडल्यावरून तोही तेथें आलेला होता. तेव्हां सुंदरशेट याची व त्याची सहज गांठ पडून, आपल्या मूर्ख पोरानें आपला कसा घात केला हा सर्व वृत्तांत त्यानें मुळजीशेटास सांगितला. तो ऐकून त्यालाही फार वाईट वाटलें. पण सुंदरशेटाचें झालेलें नुकसान भरून काढण्यास त्याला मार्ग नव्हता, यामुळें सुंदरशेटास पुढें पुष्कळ दिवस विपत्तींत काढावे लागले.

पोकळ बढाई मिरविल्यानें खऱ्याला खोट्याचें स्वरूप कसें येतें,

व त्यापासून कोठच्या कोठें कशी कळ लागते व केवढें नुकसान होतें, हें यावरून चांगलें लक्षांत येईल !

### खोटें बोलणारा मुलगा वठणीस आला त्याची गोष्ट.

सातारा जिल्ह्यांत बावधन येथें गोविंदराव या नांवाचे कोणी सुखवस्तु गृहस्थ रहात असत. त्यांनीं आपला एकुलता एक मुलगा नारायण यास वाई मुक्कामीं राघोपंत या नांवाच्या एका पंतोजीच्या येथें अभ्यासास ठेविलें होतें. राघोपंत हे मोठे सभ्य व ममताळू होते. ते नारायण यास बापाची आठवण न होईल अशा प्रकारें वागवीत असत.

एके दिवशीं गोविंदराव हे मुलाच्या समाचाराकरितां वांईस आले. ते राघोपंताचेच घरीं उतरले. ते आले त्या वेळीं नुकतेच संध्याकाळचे पांच वाजून गेले होते, व राघोपंत मुलांना सुटी देऊन दाराच्या बाहेर एका बांकावर वर्तमानपत्र वाचीत बसले होते. उभयतांचे नमस्कारचमत्कार झाल्यावर प्रथमच गोविंदरावांनीं, ' आमच्या नानाचें कसें काय बोवा चाललें आहे ? ' असा पंतोजी-बोवांस प्रश्न केला. राघोपंतांनीं हातचें पत्र खालीं ठेवलें व क्षणभर विचार करून म्हटलें, ' त्याचें ठीक चाललें आहे, अभ्यासांत तर त्याची कसूर अगदीं नाहीं. ' गोविंदराव म्हणाले, ' तुमचें बोलणें मला जरा संदिग्ध दिसतें; व यावरून त्याची इतर वर्तणूक तुम्हांला पसंत नाहीं कीं काय असा मला संशय येतो. ' राघोपंत म्हणतात, ' रावजी ! मला सांगायाला फार वाईट वाटतें कीं, त्याची इतर वागणूक—आणि विशेषेंकरून त्याला जी हरएक प्रसंगीं खोटें बोलण्याची संवय लागली आहे ती—मला अगदीं पसंत नाहीं. फार तर काय, पण त्याच्या एका शब्दावरही मला भरंवसा ठेववत नाहीं !

गोविंदराव दुःखाचा सुस्कारा टाकून म्हणतात, ' होय, तुमच्या-प्रमाणेंच मलाही याबद्दल फार वाईट वाटतें. पण मला वाटलें होतें

कीं, आजपर्यंत त्यानें ही खोड टाकली असेल. असो; आज रात्रीं मी आणखी याबद्दल त्याला चांगला बोलेन. तथापि तुम्ही नेहमीं त्याला उपदेश करीत असून तुमचें ज्याअर्थी तो ऐकत नाहीं, त्याअर्थी माझ्या सांगण्याचा उपयोग कितपत होईल हें मी जाणून आहें ! '

ह्या दोघांचें वरीलप्रमाणें बोलणें चाललें असतां नारायण हा कांहीं सोबत्यांबरोबर सुमारें अर्ध्या मैलावर खेळण्याकरितां गेलेला होता. तेथें जवळच बोरीचीं झाडें होतीं. त्यांवरचीं बोरें हीं मुलें काढूं लागलीं. पण तीं तेथें त्यांना थोडीं सांपडलीं. तेव्हां शंकर या नांवाचा एक मुलगा म्हणतो, ' गड्यांनो, आपल्याला पुष्कळ बोरें कोठें सांपडतील तें ठिकाण मला माहीत आहे. पण त्याकरितां आपल्याला ह्या माणकोजी पाटलाच्या शेतांतून पलीकडच्या कुंपणापर्यंत गेलें पाहिजे. ' हें ऐकून नारायण म्हणतो, ' एवढेंच ना ! अंः, त्यांत काय आहे ? शेत सर्व कापून त्याचे भारे बांधून टाकलेले आहेत, तेव्हां आपण गेलों तरी कांहीं हरकत नाहीं. भाऱ्यांना धक्का लावूं नये म्हणजे झालें. खेरीज पाटील कोठें आपल्याला पहायला आला आहे ? ' शंकर म्हणतो, ' छे छे ! नारायणा, हें तुझें बोलणें अगदीं बरोबर नाहीं. शेतकरी आपल्याला पाहो अगर न पाहो, त्याचे शेतांतून जाणें हें अगदीं गैर आहे. आणि तो पहात नसला म्हणून काय झालें ? ईश्वर तर आपल्याला पहात आहे कीं नाहीं ? छे बोवा ! मीं ही शेतांतून जाण्याची गोष्ट काढिली ही मजकडून मोठी चूक झाली; पण आतां मी सांगतों कीं ती गोष्ट अगदीं गैर आहे. '

शंकर हा इतकें बोलतो तों नारायण व दुसरे दोन मुलगे शेतांत शिरून अर्धेअधिक गेले देखील. मात्र शंकरासुद्धां बाकीचे सर्व तेथेंच राहिले. नारायण व त्याचे सोबती यांनीं शेतांत शिरण्याकरितां

कुंपणांतून बरीच मोठी वाट केली होती, त्याबद्दल त्यांना वाईट वाटूं लागलें. पण आतां आपण इतकें आलों त्याअर्थी मागें फिरण्यांत कांहीं अर्थ नाहीं असा त्यांनीं विचार केला. म्हणून ते होईल तितकी जलदी करून आपली वाट सुधरूं लागले. त्यांनीं त्या घाईंत शेतां-तले कित्येक भारे पाडून टाकिले. तथापि तिकडे लक्ष न देतां ते तसेच पुढें कुंपणापर्यंत गेले. तेथें बोरें पुष्कळ होतीं. तीं पाहून नारायण म्हणतो, ' बरें झालें आपण आलों तें. आतां आपण हवीं तितकीं बोरें तोडूं. ' इतक्यांत त्याच्या बरोबर गेलेल्या दोघां मुलां-पैकीं एकजण म्हणतो, ' अरे, पण तिकडे पाहिलेंत काय ? तो शेत-करी इकडेच येत आहे ! ' त्या सर्वांनीं पाहिलें तों खरोखरच शेतकरी हातांत छडी घेऊन मोठ्या जलदीनें आपणांकडे येत आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तेव्हां ते तिघेही मुलगे निरनिराळ्या वाटांनीं पळाले. त्यांपैकीं दोघे कुंपणावरून उडी मारून पलीकडच्या गल्लींत सुरक्षित निघून गेले; मात्र तिसरा नारायण हा होता, त्याचीं चिरगुटें कांट्यांत अडकल्यामुळें त्याचा घोंटाळा झाला. पण त्यानें ओढाताण करून निघून जाण्याचा यत्न केलाच. त्यांत त्याची चिर-गुटें फाटलीं व तोंडही खरचटलें. तथापि तो एकदांचा कसा तरी बाहेर पडला. पण एवढ्या कृत्याला बराच वेळ लागला, त्यामुळें नारायण हा धूम ठोकणार इतक्यांत शेतकऱ्यानें त्यास गांठून त्याची मानगोटी धरिली, आणि त्याच्या अंगावर मोठ्यानें ओरडून म्हणाला ' कायरे, येथें तूं कशाला आला होतास ? ' नारायण म्हणतो, 'अहो पाटील ! जवळच्या वाडींत कांहीं कामाकरितां मी गेलों होतों, तेव्हां परत येत असतां त्या पलीकडच्या गाई तुमच्या शेतांत शिरलेल्या पाहून त्यांना मी हांकून लावण्याकरितां येथें आलों. ' शेतकरी म्हणतो, ' तर मग काय गाईंनींच हे भारे पाडले वाटतें ? ' नाराय-णानें उत्तर केलें, ' हो, त्यांनींच. ' शेतकरी म्हणतो, ' बरें, पण तूं

धांवत कां होतास ? व दुसरे पोरगे येथें काय करीत होतें ? कां कीं, तुम्ही तिघे होतां असें मला दिसलें. ' नारायण हलक्या स्वरानें म्हणतो, 'पाटीलबोवा, मला वाटतें, मी तुमच्या शेतांत गेलों याबद्दल तुम्हांला राग आला ! ' शेतकरी डोकें हालवून म्हणतो, ' हूँ हूँ ! असें काय ! तूं माझ्या शेताची काळजी घेतल्याबद्दल मी तुझ्यावर रागावेन, नाहीं ? या तुझ्या बोलण्यावरून मला हें तुझें सगळें थोतांड दिसतें ! ' मग अमळ विचार करून म्हणतो, ' पण तूं खरो-खर अपराधी आहेस अशी माझी खात्री झाल्याशिवाय मी तुला शिक्षा करणार नाहीं. ' असें म्हणून त्यानें नारायणाचा हात धरला व त्यास फाटकापाशीं नेलें; आणि म्हणतो, ' गाईंच्या पावलांच्या खुणा अगो-दर येथें मुळींच दिसत नाहींत; आणि फाटकही चांगलें बळकट लावलेलें असून मीं तें जसें बांधून टाकिलेलें होतें तसेंच कायम आहे. तर आतां माझ्या सर्व कांहीं लक्ष्यांत आलें. गुलामांनो ! तुम्ही येथें चोरी करण्याकरितां आलां होतां, व आपला अपराध छपविण्या-करितां कांहीं तरी बहाणा तूं मला सांगत आहेस ! पण तूं आतां माझ्या हातीं सांपडला आहेस, तर तुला मी चांगलें बक्षीस दिल्या-खेरीज सोडायाचा नाहीं ! ' असें म्हणून त्यानें आपल्या हातांतली छडी नारायणावर उगारली असतां तो मोठ्यानें रडून व त्याच्या पायां पडून म्हणतो, ' अहो पाटील ! मी चोरी करण्याकरितां मुळींच आलों नव्हतों—मला कोणीं एवढें जग दिलें तरी मी चोरी करणार नाहीं ! आम्ही तिघेजण येथें आलों होतों, व ते कशाकरितां आलों होतों तें आतां तुम्हांला खरें खरें सांगतों. आम्ही फक्त या ठिकाणीं बोरें तोडण्याकरितां आलों होतों, व सहजगतीनें आमच्याकडून भारे अशा रीतीनें पडले. हाच काय तो अगदीं वास्तविक प्रकार आहे. ' शेतकरी म्हणाला, ' पण हें तरी खरें आहे असें मी कशावरून समजूं ? छी ! छी ! खोटें बोलणाऱ्यावर मी कदापि भरंवसा ठेवणार

नाहीं! ' तेव्हां नारायणानें, मी पुनः खोटें बोलणार नाहीं, एकवार मला क्षमा करा, असें परोपरीनें शेतकऱ्यास विनविलें; पण शेतकऱ्यानें त्यास चांगला फर्मास मार दिल्यावांचून जाऊं दिलें नाहीं !

रात्रीं जेव्हां नारायण घरीं आला, तेव्हां आज ह्या स्वारीला कांहीं तरी अद्दल घडली असावी असें पंतोजीबोवांच्या व गोविंद-रावांच्याही लक्ष्यांत आलें. गोविंदराव म्हणतात, ' नाना, तूं एवढा वेळपर्यंत कोठें होतास ? व तुझी बंडी वगैरे अशी कशी फाटली ?' पण नारायणानें गुडघ्यांत मान घातली, व कांहीं उत्तर केलें नाहीं. गोविंदराव मनांत म्हणाले, ' तूर्त थोडा वेळ याच्याशीं न बोलावें हें बरें. ' मग जेवणखाण झाल्यावर ते मुलास म्हणतात, ' नाना, आज तुझ्या हातून कांहीं तरी चूक झाली आहे यांत संशय नाहीं.' नारायण म्हणतो, ' कांहीं नाहीं, फक्त,—' गोविंदराव म्हणाले, ' जरा थांब, मी काय म्हणतों तें ऐक आणि मग बोल. हें पहा, तूं खोटें बोलून एकाचे ठिकाणीं दोन अपराध करूं नको; कारण एक तर, खरोखर तूं काय केलें आहेस हें आतां जरी सांगितलें नाहींस, तरी आगेमागें राघोपंतांना तें कळल्याशिवाय राहणार नाहीं, व त्यांच्या-कडून केव्हां ना केव्हां तरी मलाही कळेलच. जर तूं आज आम्हांला खोटें सांगून फसविण्याचा यत्न केलास तर त्यापासून पुढें तुजवर आमची इतराजी कमी न होतां उलटी जास्तच होईल!' मग नारायण डोळ्यांत आंसवें आणून म्हणतो, ' बाबा! मी आतां कांहींएक न चोरतां तुम्हांला सर्व सांगतों. मी पूर्वींच तुम्हांला सर्व सांगणार होतों, पण मला धैर्य होईना. बाबा! माझ्या हातून फार मोठी चूक झाली; पण तिजबद्दल मला शासनही जबर झालें. खेरीज जो अपराध मी केला नव्हता त्याचा दोष माझ्या माथीं आला!'

मग हीं मुलें खेळायाला निघाल्यापासून शेतकऱ्याचा व नारा-यणाचा जो प्रसंग झाला तेथपर्यंत घडलेली सर्व हकीकत त्यानें

बापास सांगितली. त्यानें सर्व वृत्तांत पुरा केल्यावर गोविंदराव व राघोपंत हे एकमेकांच्या तोंडांकडे पहात क्षणभर स्तब्ध राहिले. तेव्हां नारायण म्हणतो, 'काय? तुम्हांस अजूनही माझें बोलणें खरें वाटत नाहीं? तुमचे पाया साक्ष, मी यावेळेस एक अक्षरही खोटें बोललों नाहीं!' राघोपंत म्हणतात, 'तूं नाहीं बोललास असें मलाही वाटतें; पण आम्हांला तूं इतक्या वेळां फसविलें आहेस कीं, तुझ्या बोलण्यावर भरंवसा ठेवणें अगदीं अशक्य झालें आहे!' हें ऐकून नारायणानें लज्जित होऊन खालीं मान घातली. इतक्यांत राघोपंतांनीं उठून डोकीस पागोटें घातलें आणि म्हणाले, 'चला आपण सगळेजण शंकराच्या घरीं जाऊं, आणि त्याला ही हकीकत कशी काय झाली ती विचारूं. तो आपल्या प्राणाच्या रक्षणार्थ खोटें बोलणार नाहीं अशी माझी खात्री आहे. म्हणून नारायणा, तो जर सांगेल कीं तुझी गोष्ट खरी आहे, तर मग आम्हांला कांहीं संशय राहणार नाहीं.' नंतर ते शंकराच्या घरीं गेले, त्यानें नारायणाची व त्याजबरोबर गेलेल्या दोघां मुलांची व आपली फाटाफूट होईपर्यंत झालेला सर्व वृत्तांत सांगून म्हटलें, 'यापुढें काय झालें तें मला माहीत नाहीं. मात्र माणकोजी पाटील हा घरीं परत येत असतां संतप्त झालेला असा मला दिसला.' गोविंदराव म्हणतात, 'हँ, आतां बरोबर मेळ जमला. राघोपंतदादा, आतां आपल्याला नारायणाच्या बोलण्यावर विश्वास ठेवण्यास हरकत नाहीं.' पंतोजीबोवा म्हणाले, 'हो, आता मलाही कांहीं संशय राहिला नाहीं.'

मग घरीं आल्यावर गोविंदराव मुलास आपल्या शेजारीं बसवून म्हणतात, 'नाना! आतां यावरून पहा कीं, खोटें बोलणारा म्हणून जो एकदां ठरला, तो जरी खरें बोलला तरी त्याच्या बोलण्यावर कोणी विश्वास ठेवीत नाहीं. शिवाय असत्य भाषण करणें हा महान्

अपराध होय हें तर खरेंच. पण याहीपेक्षां, असत्य भाषण करणाऱ्याचा परमेश्वरास कंटाळा आहे, ही गोष्ट विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे.' मग नारायण म्हणतो, 'बाबा! इतःपर माझा प्राण गेला तरी मी खोटें बोलणार नाहीं, याविषयीं तुम्हीं पक्की गांठ बांधून ठेवा!' गोविंदराव म्हणतात, 'मुला, तुला ही पुष्कळ दिवसांची संवय लागली आहे, त्यामुळें ती मोडण्यास कांहीं दिवस तुला जड जाईल खरें; पण तूं जर त्याकरितां सतत प्रयत्न केलास, व अगदीं हलक्यासलक्या कामांत—थट्टामस्करींत देखील—खोटें बोलावयाचें नाहीं असा दृढनिश्चय ठेविलास, तर तुला या कामीं यश आल्यावांचून कधींही राहणार नाहीं.'

---

## ज्ञानवंत सुखी असतो.

श्लोक.

ज्ञानेंकरोनि रमतें मन हो जयाचें
    आहे खरोखरिच पुण्य महा तयाचें
त्यासारखा जन सुखी त्रिजगांत नाहीं
    कीं त्याजला किमपि ऊन[1] पडे न कांहीं. १
मी मी करोनि करिती जन गर्व जो तो
    पाहोनि सत्य परिणाम विनम्र होतो
तेणें स्वमित्र गणितात तयास सारे
    अप्रीति यास्तव अपाप अशेष वारे! २
नानाप्रयत्न करितां धरणीपतीचे
    देखील यत्न फसतात महामतीचे[2]

---

१ उणें. २ मोठ्या बुद्धिमानाचें.

सिद्धीस यास्तव जगत्पतिसाह्य व्हावें
तें मागतो नमुनि त्यास अनन्यभावें. ३
होणार तें प्रबळ भूपतिला टळेना
होणार काय पुढतींहि कुणा कळेना
त्याच्या करा मग कशास्तव काळजीतें
यां निश्चयें स्थिर सदा धरितो मतीतें. ४
संपत्ति आप्त जन हीं क्षणिकेंचि होती
त्यांहीं सुखें न असुखें जगतांत होती
जाणोनि तद्विषयलोभ[1] जिवीं धरीना
दुःखी तया विरह त्यास कधीं करीना[2] ! ५
अन्योपकारसम पुण्य असे न मोठें
नाहींच पाप परपीडनतुल्य कोठें
हें ज्ञानतत्त्व दिनरात तयांत जागे
लोकांत तें धरुनि धोरण नित्य वागे. ६
समाधान आहे जनप्रेम आहे
जगत्पालकीं भक्तिवैपुल्य आहे
नसे याहुनी दूसरें सौख्य नाकीं[3]
धरा[4] स्वर्ग सुज्ञांस ही भावना कीं. ७

---

## कर्तव्यकर्म.

' जगांतील प्रत्येक मनुष्यास कर्तव्यकर्म आहेच. उच्च, नीच, कोणत्याही स्थितींत मनुष्य असला तरी त्यास अवश्य केलें पाहिजे

---

१ त्याविषयींचा लाभ. २ वरील चरणाचा संबंध घेऊन या चरणाचा एकंदर अर्थ असा घ्यावाः-तेव्हां अर्थातच त्या लोभापासून यास (ज्ञानवंतास) दुःख किंवा विरह कांहींएक होत नाहीं. ३ स्वर्गी. ४ पृथ्वी.

असें कांहीं तरी कृत्य असणारच. तें त्यानें केलेंच पाहिजे. तें त्याजकडून झालें नाहीं तर त्याच्या अंगीं सद्वर्तन राहणार नाहीं. आयुष्याच्या अमुकच भागांत मनुष्यास कर्तव्यकर्म करायाचें असतें असें नाहीं. जन्मभर तें त्याच्या पाठीमागें लागलेंच आहे. लहानपणीं आईबापांच्या आज्ञेंत वागण्यापासून कर्तव्यकर्मास आरंभ होतो पुढें स्त्रीपुरुष, पितापुत्र, गुरुशिष्य, स्वामिसेवक, इत्यादि संबंध मनुष्यास प्राप्त होऊन त्याप्रमाणें आपलें कर्तव्य यास करावें लागतें. या सर्व प्रसंगीं योग्य रीतानें वागलें तरच मनुष्याचें सद्वर्तन कायम राहील.

' कर्तव्यकर्माकडे ज्यांचें लक्ष आहे. त्यांच्या हातून कधींही अन्याय घडणार नाहीं. अमुक स्थितींत किंवा अमुक कामांतच कर्तव्यकर्माकडे लक्ष पाहिजे असें नाहीं. तें सर्व स्थितींत व सर्व कामांत सर्वकाळ असलें पाहिजे. अंगीं मोठी विद्वत्ता किंवा बुद्धिमत्ता असून कर्तव्यकर्माकडे लक्ष्य व सदसद्विचार या दोन गोष्टी नसतील तर त्यापासून हित न होतां उलटा तोटा होण्याचा संभव आहे. ज्या थोर मनुष्यांचें कर्तव्यकर्माकडे लक्ष्य असतें, तें ऐश्वर्यादिकांची---किंबहुना आपल्या जिवाची देखील---पर्वा करीत नाहींत.'*

## रामशास्त्री प्रभुणे.

थोरले माधवराव पेशवे यांचे कारकीर्दींत रामशास्त्री प्रभुणे या नांवाचे मुख्य न्यायाधीश पुण्यास होते. हे गृहस्थ मूळचे अतिशय गरीब स्थितींतले असून केवळ स्वपराक्रमानें एवढ्या उच्च पदास चढले होते. हे शास्त्रीबोवा इतके निस्पृह व कर्तव्यास जागणारे होते कीं, ते प्रत्यक्ष आपले यजमान पेशवे यांची देखील प्रसंगीं पर्वा करीत

* अवतरणचिन्हांतील मजकूर ' सद्वर्तन ' पुस्तकांतून घेतला आहे.

नसत. ग्रांट डफ् साहेबांनीं यांविषयीं म्हटलें आहे कीं, हे सन्मार्गानें वागणारास आप्तासारखे व दुष्टास यमासारखे होते.

माधवराव पेशवे यांस एकदां पंडितांचे भाषणेंकरून अशी इच्छा झाली कीं, कांहीं तपस्या करावी. तेव्हां ते जप करूं लागले. एके दिवशीं ते जपास बसले असतां, रामशास्त्री कांहीं कामानिमित्त त्यांजकडे गेले. तेव्हां जवळच्या शिष्यांनीं सांगितलें कीं, या वेळेस श्रीमंतांची गांठ पडणार नाहीं; कां कीं, ते जपास बसले आहेत. यावरून रामशास्त्री यांनीं घरीं जाऊन विचार केला कीं, जर आपण याविषयीं वाद करावा तर तें ठीक नाहीं. तेव्हां यांचा आश्रय सोडून जावें, हें बरें. मग दुसरे दिवशीं त्यांजकडे जाऊन म्हणाले, ' मला काशीस जावयास आज्ञा द्यावी. ' हें ऐकून माधवराव मनांत समजून गेले, व बोलले कीं, ' काल आपण येऊन गेलां, ते समयीं मी जप करीत होतों, ह्यामुळें माझी गांठ पडली नाहीं. ' त्यावर शास्त्री यांनीं उत्तर केलें कीं, ' आपण सबब सांगतां ती ब्राह्मणास योग्यच आहे; परंतु ब्राह्मण जर आपलें कर्म सोडून राज्य करूं लागले तर त्यांनीं प्रजापालन करावें हेंच त्यांस योग्य आहे. जर आपल्या चित्तांत जप करावा असें आहे, तर हें राज्य टाकून मज-बरोबर चलावें, मी तें आपणांस चांगलें शिकवीन. ' तें ऐकून माधवराव यांनीं मनांत उमजून पुढें जप करण्याचें सोडून दिलें, व रामशास्त्री यांचे अनुलक्ष्येंकरून वागूं लागले.

रामशास्त्री यांनीं या प्रसंगीं जें वर्तन केलें, तसें वर्तन करण्याचें धैर्य अंगीं असणारे लोक धन्य होत. त्यांनीं आपलें ऐश्वर्य व अधि-कार जाईल या गोष्टीकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं, तर आपल्या कर्तव्यकर्माकडे लक्ष दिलें.

पुढें माधवरावसाहेब यांचे पश्चात् नारायणराव पेशवे गादीवर बसल्यावर थोडक्याच दिवसांनीं त्यांस मारेकऱ्यांनीं मारिलें ही गोष्ट

प्रसिद्धच आहे. त्या बंडाळीच्या प्रसंगीं शास्त्रीबोवांनीं जें धैर्य प्रकट केलें त्याचें किती म्हणून वर्णन करावें ! त्यांनीं नारायणरावांचा खून करण्याचे कामांत कोणाकोणाचें अंग होतें याचा बारकाईनें शोध चालविला. तेव्हां असें उघडकीस आलें कीं, राघोबादादाची बायको आनंदीबाई हिनें नवऱ्याचें मन वळवून त्याजकडून नारायणरावांस ' धरावें ' अशाबद्दल पत्र घेतलें. त्या पत्रांतील ' ध ' चा ' मा ' आनंदीबाईनें करून सुमेरसिंग वगैरे गारद्यांस तें दाखविलें, व त्यांनीं त्यावरून पुढें नारायणरावांचा वध केला. असो, तेव्हां राघोबादादास, ही गोष्ट खरी काय म्हणून शास्त्रीबोवांनीं विचारिलें असतां, 'धरावें' अशाबद्दल मीं पत्र दिलें होतें हें त्यानें कबूल केलें; व यास प्रायश्चित काय म्हणून विचारिलें. तेव्हां त्या निस्पृह पुरुषानें उत्तर केलें कीं, 'यास देहान्तप्रायश्चिताखेरीज दुसरें प्रायश्चित्त नाहीं.' या प्रसंगीं तर शास्त्रीबोवांनीं जिवाचीही आस्था बाळगिली नाहीं असें म्हटलें पाहिजे ! कां कीं, तशा बंडाळीमध्यें त्यांच्या स्पष्टोक्तीबद्दल त्यांचें डोकें जाण्याचाही संभव होता !

## जॉर्ज वॉशिंग्टन.

प्रख्यात सेनापति जॉर्ज वॉशिंग्टन, ज्यानें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांस स्वातंत्र्य प्राप्त करून दिलें, तो त्या संस्थानांचा अध्यक्ष असतां त्यानें आपलें कर्तव्य बजावण्यांत एके प्रसंगीं जी निस्पृहता दाखविली तिच्या संबंधाची गोष्ट फार लक्षांत ठेवण्यासारखी आहे. वॉशिंग्टन याचा एक मोठा जिवलग मित्र होता. तो, वॉशिंग्टननें ज्या लढाया केल्या त्या सर्वांत त्याच्या बरोबरीनें लढलेला असून नेहमीं त्याच्या समागमांत असे. हा गृहस्थ शूर, स्वभावानें मोठा गोड, मित्राच्या ठायीं अकृत्रिम प्रेम ठेवणारा, व कोणाच्याही डोळ्यांत खुपावयाचा नाहीं असा होता. तथापि राज्यकारभाराच्या कामांत तो निष्णात नव्हता.

एकदा असें झालें कीं, दरबारांत एक मोठ्या पगाराची जागा रिकामी झाली. ती वाटेल त्यास देण्याचें वॉशिंग्टन याच्या हातांत होतें. तेव्हां लोकांनीं साहाजिकच असें अनुमान केलें कीं, ज्यानें आजपर्यंत इतक्या लढाया करून देशाचें मोठें हित केलें, व जो वॉशिंग्टन ह्याचा परममित्र आहे, त्यास ही जागा मिळाल्यावांचून रहाणार नाहीं.

परंतु इकडे असें झालें कीं, त्या जागेकरितां दुसऱ्या एका गृहस्थाचा अर्ज आला. हा गृहस्थ मोठा सचोटीचा असून राज्यकारभाराचे कामांत फार हुशार होता खरा परंतु तो राजकीय संबंधानें वॉशिंग्टन याचा प्रतिस्पर्धी असून त्यानें हरएक प्रसंगीं वॉशिंग्टन याच्या कामांत अडथळा आणिलेला होता. तेव्हां याला जागा मिळण्याचा मुळींच संभव नाहीं असें सर्वांस वाटलें. परंतु कर्तव्यकर्माच्या दृष्टीनें वॉशिंग्टन ह्याला हाच मनुष्य पसंत पडला, व त्यानें त्यासच त्या जागेवर नेमिलें !

यावरून वॉशिंग्टन याच्या दुसऱ्या एका मित्रानें त्यास म्हटलें कीं, 'या वेळीं तुम्हीं ही गोष्ट अगदीं अन्यायाची केली.' त्याला वॉशिंग्टन यानें उत्तर दिलें कीं, 'ज्या माझ्या मित्राच्या संबंधानें मी अन्यायानें वागलों असें तुम्हीं म्हणतां, त्याच्या माझ्या मित्रत्वांत मुळींच उणेपणा नसून घरगुती नात्यानें त्याला मी फार मानतों इतकेंच नाहीं, तर तो व मी दोन आहों असें मुळींच समजत नाहीं. असें जरी आहे, तरी मला हें स्पष्ट सांगितलें पाहिजे कीं, राज्यकारभाराचे कामीं त्याचा फारसा उपयोग मला व्हावयाचा नाहीं, व त्याच्या प्रतिस्पर्ध्याशीं जरी कामकाजासंबंधानें माझा मतभेद आहे, तरी तो मोठा वाकबगार मनुष्य आहे ही गोष्ट कोणीही नाकबूल करणार नाहीं. तेव्हां संयुक्त संस्थानांचा अध्यक्ष या नात्यानें तोच मनुष्य माझ्या उपयोगाचा आहे. या कामांत मी वॉशिंग्टन असें

समजून वागलों नाहीं, तर संयुक्त संस्थानांचा अध्यक्ष असें समजून जें काय माझें कर्तव्यकर्म होतें तें मीं केलें!'

## राजपुत्र आणि न्यायाधीश.

इंग्लंडचा राजा चौथा हेन्री याचा ज्येष्ठ पुत्र, युवराज प्रिन्स ऑफ वेल्स, म्हणजे जो पुढें पांचवा हेनरी म्हणून प्रसिद्ध झाला, तो मोठा शूर असून राज्यकारभारांतही हुषार होता. परंतु लहानपणीं म्हणजे तो राज्यारूढ झाला नव्हता तेव्हां, फार अर्वाच्य व हूड असे, आणि टवाळ लोकांच्या संगतीनें अनेक नीच व मूर्खपणाचीं कृत्यें करीत असे.

एके प्रसंगीं त्याच्या एका मित्रास कांहीं अपराधावरून मुख्य न्यायाधीशानें कैदेची शिक्षा दिली. त्यावेळीं राजपुत्र हा कोर्टांत आलेला असून तो ती शिक्षा ऐकल्याबरोबर पराकाष्ठेचा संतापला. आणि न्यायाधीशाची बेअदबी करून आपल्या मित्रास सोडून देण्याविषयीं त्यास हुकूम करूं लागला. तो म्हणाला, 'राजपुत्राच्या मित्रास कैदेची शिक्षा देणें हें अगदीं गैर आहे; व मी प्रिन्स ऑफ वेल्स या नात्यानें तुम्हांस हुकूम करितों कीं, हा मनुष्य माझा स्नेही आहे, यासाठीं याला तुम्ही रस्त्यांतल्या एकाद्या सामान्य चोराप्रमाणें समजून वागवूं नका!'

न्यायाधीशानें उत्तर केलें कीं, 'मी या ठिकाणीं प्रिन्स ऑफ वेल्स याला बिलकूल ओळखीत नाहीं. मीं न्यायाचे कामीं पक्षपात करणार नाहीं अशी शपथ वाहिली आहे, तेव्हां जी गोष्ट न्यायाची दिसेल ती केल्यावांचून कदापि मी राहणार नाहीं.' हें ऐकून राजपुत्र फारच चवताळला, व जबरदस्तीनें त्या कैद्यास सोडून देण्याचा यत्न करूं लागला. पण न्यायाधीशानें त्याला साफ सांगितलें कीं, 'या कामांत हात घालण्याचा तुम्हांला अधिकार नाहीं,

च तुम्ही कोर्टांत उगीच दंगा माजवूं नका.' त्याचें हें भाषण ऐकून तर राजपुत्राच्या तळव्याची आग मस्तकास गेली, आणि त्यानें भर-कोर्टांत न्यायाधीशाच्या तोंडांत मारली !

त्यावरून न्यायाधीशानें लागलींच युवराज व त्याचा मित्र या उभयतांसही एकदमच तुरुंगांत घेऊन जाण्याविषयीं हुकूम केला. तो म्हणाला, 'यानें माझा अपमान केला म्हणून मी असें करितों.' नंतर राजपुत्रास उद्देशून तो म्हणाला, 'अहो, तुम्हांला पुढें राज्यपदारूढ व्हावयाचें आहे. तर तुम्ही स्वतःच जर याप्रमाणें राज्याच्या कायद्यास धाब्यावर बसवूं लागलां, तर तुमची प्रजा हुकूम कसा मानील ?'

हें ऐकून राजपुत्राच्या हृदयांत प्रकाश पडला व तो फार ओशाळा झाला, आणि पुढें कांहीं एक न बोलतां न्यायाधीशास लवून मुजरा करून तुरुंगाकडे चालता झाला. ही गोष्ट राजाच्या कानीं जेव्हां गेली, तेव्हां तो म्हणाला, 'अशा प्रकारें निःपक्षपातपणानें कायद्याची अंमलबजावणी करणारा न्यायाधीश माझ्या राज्यांत असून त्या कायद्याला मानणारा असा पुत्र मला आहे हें पाहून मी आपणाला धन्य समजतों ?'

पुढें बापाच्या मागें प्रिन्स ऑफ् वेल्स हा सिंहासनारूढ झाल्या-वर न्यायाधीशास भय पडलें कीं, आतां आपला सूड उगवल्या-वांचून हा राहणार नाहीं. तथापि हा न्यायाधीशाचा समज चुकीचा ठरला. कारण तो जेव्हां ह्या नव्या राजाच्या भेटीस गेला, तेव्हां त्यानें त्याचा मोठा आदर करून, आपल्याला बोध होण्यासारखें निस्पृहतेचें वर्तन पूर्वीं केल्याबद्दल त्याचे आभार मानले आणि तसेंच पुढें त्याला त्याच्या कामावर ठेविलें. हा राजा त्यास आणखी असेंही म्हणाला कीं, 'मी तुमच्याशीं जसें वर्तन केलें तसें वर्तन

करणारा पुत्र मला झाला तर त्याचा कान टोंचण्यास तुम्हासारखा इमानी व कर्तव्यदक्ष न्यायाधीश मला मिळो एवढेंच मी इच्छितों '

**बावीस हजार रुपयांस लाथ मारिली !**

ग्रेटब्रिटन व ऐर्लंड या संयुक्त राज्याचा कारभार तेथील राज्याधिकारी राजा किंवा राणी यांच्या हुकुमानेंच केवळ चालतो असें नाहीं; तर तेथें पार्लमेंट नांवाची जी मोठी सभा आहे तिच्या अनुमतानें बहुतकरून तो चालतो हें प्रसिद्धच आहे. ग्रेटब्रिटनांत इंग्लंड, स्कॉट्लंड व वेल्स हे देश येतात. यांपैकीं स्कॉटलंड देशांत अशी चाल आहे कीं, ज्या गांवांस पार्लमेंट सभेस सभासद पाठविण्याचा अधिकार आहे, अशा चार किंवा पांच गांवांमिळून एक सभासद नवीन निवडून पाठवितात. परंतु जेव्हां चार गांव मिळून सभासद पाठवावयाचा असतो, व निवडणुकीकरितां दोन उमेदवार आलेले असतात, तेव्हां एकादे वेळीं असें होतें कीं, दोन गांवांचें मत अमुक एकास निवडावा असें पडतें, व दोन गांवांचें मत त्याच्या प्रतिस्पर्ध्यास पसंत करावा असें पडतें. तेव्हां अशा प्रसंगीं येणारी अडचण दूर करण्याकरितां तेथें अशी व्यवस्था केली आहे कीं, त्या चार गांवांपैकीं एका गांवास एक मत जास्त देण्याचा अधिकार दिलेला आहे, व या अधिकाराचा उपयोग प्रत्येक गांवानें पाळीपाळीनें घ्यावा असें ठरविलें आहे.

इ० स० १८०७ मध्यें पार्लमेंट सभा बरखास्त होऊन सभासदांची नवीन निवडणूक झाली त्या वेळीं वरीलप्रमाणें अडचण आली. तेव्हां ज्या गांवास एक मत अधिक देण्याचा अधिकार त्यावेळीं होता, त्या गांवांतील लोकांचीं मतें दोघां उमेदवारांस सारखीं मिळूं लागलीं. तेव्हां कोणाकडे तरी एक मत अधिक झाल्यावांचून या गोष्टीचा निकाल होणें अशक्य होतें. याकरितां मत देणाऱ्या लोकांपैकीं एकाचें मत आपल्याकडे जास्त यावें

म्हणून दोघां उमेदवारांपैकीं एकाच्या स्नेह्यांनीं खटपट चालविली. त्या मत देणाऱ्या लोकांत एक लोहार होता, त्यानें आपल्या-तर्फेच्या उमेदवारास निवडण्याविषयीं आपलें मत द्यावें म्हणून त्या लोकांनीं त्याचें फार आर्जव केलें. परंतु त्यानें एकच उत्तर दिलें कीं, 'मीं दुसऱ्या उमेदवाराकरितां आपलें मत देण्याचा पूर्वींच विचार केला आहे, तो कदापि फिरणार नाहीं.' त्यावरून त्यांनीं त्यास अशी लालूच दाखविली कीं तूं आमच्या म्हणण्याप्रमाणें कर-शील तर तुला आम्ही एकादी चांगली जागा देण्याची तजवीज करूं, व खेरीज तुझ्या मुलाबाळांचीही चांगली सोय लावून देऊं. परंतु त्या प्रामाणिक मनुष्याचा निश्चय यत्किंचित्‌ही ढळला नाहीं. तो त्यांस म्हणाला, 'कोणाही मनुष्यास मत देण्याचा जो अधिकार मिळालेला असतो त्याचा त्यानें आपल्या बांधवांच्या कल्याणाकडे उपयोग केला पाहिजे; व माझ्या बांधवांचें हित जेणेंकरून होईल तेंच करावें असें माझी मनोदेवता मला सांगत आहे, त्याप्रमाणें मी करणार. कोणा एखाद्या व्यक्तीस संतुष्ट करण्यासाठीं आपल्या मताचा विकरा करणें अगदीं नीचपणाचें काम आहे.' इतकें तो बोलला तरी लोकांनीं आणखी त्याची पाठ पुरविलीच. त्यांनीं त्यास सांगि-तलें कीं, 'आम्हीं पूर्वीं जें वचन तुला दिलें आहे त्याशिवाय तुला मोठी रोकड रक्कमही देतों.' इतकें करूनही जेव्हां तो ऐकेना, तेव्हां त्यांनीं त्यास रोकड रक्कम द्यावयाची ती वाढवितां वाढवितां पंधराशें पौंडांपर्यंत वाढविली! तथापि तो खऱ्या अंतःकरणाचा मनुष्य त्यांस बिलकुल बधला नाहीं, व त्यानें पूर्वींच्या संकेताप्रमाणें दुसऱ्या उमे-दवाराच्या तर्फेनें आपलें मत दिलें.

या मनुष्याच्या थोरवीचें वर्णन करावें तितकें थोडेंच! पंधराशें पौंड–म्हणजे सुमारें बावीस साडेबावीस हजार रुपये–एवढ्या रकमेस

ज्यानें लाथ मारली तो खरोखर केवळ असामान्य पुरुष होय, असें म्हटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. असे पुरुष हजारांत-किंबहुना लाखांत-किती सांपडतील बरें ?

## राजानें आपलें खरें कर्तव्यकर्म बजाविलें.

जर्मनीदेशांत बारीथ म्हणून एक लहानसें संस्थान आहे. तेथें सुमारें शंभर सवाशें वर्षांपूर्वी जॉर्ज लुई या नांवाचा एक मांडलिक राजा होऊन गेला. त्याला एके प्रसंगीं कर्ज फार झालें, व खजिन्यांतही मुळींच शिल्लक राहिली नाहीं. तेव्हां दरबारी लोकांनीं त्यास सुचविलें कीं, ही अडचण पार पाडण्याकरितां लोकांवर नवीन कर बसवावे. राजसत्ता हातीं असून या युक्तीचें अवलंबन करणार नाहीं असा पुरुष बहुधा आढळणें कठिण. परंतु,

> प्रजा हाच कीं वत्स भूधेनुकेचा[1]।
> नृपा तूं करीं फार सांभाळ याचा
> स्ववत्सांचिया[2] जाण वात्सल्ययोगें[3] ॥
> अभीष्टार्थ[4] देईल हे भूमि वेगें ॥ १ ॥

या श्लोकांत, राजांनीं सदोदित आपल्या अंतःकरणांत ठेवण्यासारखा जो उपदेश आहे त्याचें तत्त्व वरील राजा ओळखून होता असें दिसतें ! कां कीं, दरबारी लोकांनीं सुचविलेली गोष्ट त्यानें अगदीं नापसंत केली. तो म्हणाला 'हें कर्ज होण्यास मी कारणीभूत झालों आहें. लोकांशीं याचा कांहींएक संबंध नाहीं. तेव्हां त्याजबद्दल त्यांजवर काय म्हणून भार पाडावा?' असा विचार मनांत आणून त्यानें कोणाचें न ऐकतां, केवळ बडेजावीकरतां ठेवलेल्या मोठ्या खर्चाचा सर्व लवाजमा कमी केला, आणि स्वित्झर्लंडांतील जिनीवा नामक शहरीं एखाद्या सामान्य मनुष्याप्रमाणें जाऊन राहिला.

---

१ पृथ्वीरूपी गाईचा. २ आपल्या लेंकराच्या. ३ प्रेमास्तव. ४ इच्छित फळ.

तेव्हां थोड्याच वर्षांत त्याच्या नेमणुकीपैकीं पुष्कळ पैसा शिल्लक पडून त्याचें सगळें कर्ज फिटलें मग तो आपल्या संस्थानास परत आला, व त्याची सर्व व्यवस्था उत्तम प्रकारें लागून पहिल्यापेक्षां दसपट तो लोकप्रिय झाला.

या राजानें आपलें खरें कर्तव्यकर्म बजाविलें असें कोण म्हणणार नाहीं? याप्रमाणेंच जर सगळे राजे व इतर लोक आपल्या कर्तव्यास जागतील, तर जगांतील सर्व विपत्ति नाहींशी होऊन जिकडे तिकडे सौख्य व आनंद यांची समृद्धि होईल !

---

## राजनीति.

### ओंव्या.

ऐश्वर्य लाधल्या संपूर्ण, धर्मीं वर्तत असे कीं मन<br>
राज्यमदें दुरभिमान, तुज संचरला नाहीं कीं. १<br>
वडील आचरले जो धर्म, तोच चालविशी कीं नेम<br>
विहितभंगाचा कर्दम तुज लेपला नाहीं कीं. २<br>
अनायासी हो कीं सायासीं, भाग्यें जोडिल्या संपत्तीसी<br>
विभागूनी समस्तांसी, सेविसी कीं सुजाणा. ३<br>
अहोरात्रीं साठ घडी, लोटतां पापपुण्याची जोडी<br>
किती झाली हें घडोघडी, विचारीत असती कीं. ४<br>
समता, संतोष, सद्विवेक, चौथा साधुसंग देख<br>
यांशीं करूनियां सख्य, मित्रभावें असती कीं. ५<br>
कामक्रोधलोभत्रया, मोह मद मत्सर यया

---

१ मुक्तेश्वरकृत सभापर्वांत नारदमुनीनीं धर्मराजास प्रश्नद्वारा ही नीति सांगितली आहे. २ कर्तव्यकर्माच्या भंगाचा. ३ चिखल.

वर्जित्यां नियोजित्यां ठाया[1], जाणसी कीं जाणत्या. ६
काम असावा ईश्वरभजनीं, क्रोध असावा इंद्रियदमनीं
तीर्थप्रसादशेषग्रहणीं, लोभ अपार असावा. ७
मोह असावा सज्जनाशीं, मद असावा दुर्जनाशीं
मत्सर सदा संसाराशीं, असावा तो असे कीं. ८
निर्लोभी आणि विश्वासिक, वंशज असती कीं सेवक
जे स्वामिकाजीं देख, देह देती सांडणें[2]. ९
वेतन भक्षूनि पवित्र, राजद्रव्य ज्यां अपवित्र
ऐसेनि योगें स्वतंत्र, स्वस्वव्यापारीं असती कीं. १०
अचाट कार्य साधी भृत्य[3], वेतनाहून शतगुणित
द्रव्य देऊन त्याचें चित्त, संतोषवीत आहेस कीं. ११
आपुल्या काजीं पावले मरण, त्यांचीं कुटुंबें आश्वासून
आपल्या कुटुंबासमान, पाळिशी कीं दयाळा. १२
परगुणपरीक्षा जाणणें, चित्त कळवळे परवेदनें
हीं मुख्य प्रभूचीं लक्षणें, तुझ्या ठायीं असती कीं. १३
नेमाहूनि आगळें धन, घेऊन प्रजांचें पीडन
करिती जे अयोग्य प्रधान, ते पदांतीत करिशी कीं. १४
सांगावया क्लेश-गोष्टी, दुर्बळ घेऊं इच्छिती भेटी
तयां येतयां आडकाठी, तुझ्या द्वारीं नाहीं कीं. १५
आंगींचें एक रोम[5] उपडे, तें जैसें हृदया ठाउकें पडे
तेंवि प्रजा पावतां पीडे, जाणशी कीं तत्काळ. १६
तुझिया राज्यामाजी प्राज्ञा, पुत्र पाळिती पित्राज्ञा
न करितां पुरुषांची अवज्ञा, स्त्रिया स्वधर्मं असती कीं. १७

---

१ वर्जित्या नियोजित्या ठाया=कोठें टाकावें व कोठें धरावें तें ठिकाण. २ देह देती सांडणें=शरीरही खर्ची घालतात. ३ सेवक. ४ बडतर्फ. ५ केंस.

बोलों जाणती समयोचित, चतुर जे का शास्त्री पंडित<br>
ते ते शिष्ट संग्रहाआंत, ठेविशी कीं नरेंद्रा. १८

जागा होऊनि अपररातीं, सारासारविचारनीती<br>
मोक्षोपाय भवनिवृत्ति[1], विचारीत अससी कीं. १९

अजिंक्य शत्रूतें जिंकावें, जिंकिले ते प्रतिपाळावे<br>
शरणागत ते रक्षावे, ऐसें करीत असती कीं. २०

तुवां अथवा प्रधानीं, रहस्यें[2] बोलिजे एकांतस्थानीं<br>
तें बाहेर लोकांचे कानीं, प्रकट होत नाहीं कीं. २१

अर्थव्ययांचे[3] अधिकारी, गणक[4] लेखक[5] प्रथम प्रहरीं<br>
सिद्धपत्रें[6] घेऊनि करीं, उभे सन्मुख असती कीं. २२

जो का राजा ऐशिये परी, चहूं वर्णांचें पालन करी<br>
पृथ्वी भोगोनि लोकांतरीं[7], शक्रसायुज्य[8] स्वयें पावे. २३

---

१ संसाराविषयीं विरक्तता. २ गुप्त गोष्ट. ३ अर्थव्ययाचें अधिकारी=फडणीस, खजानजी. ४ ज्योतिषी. ५ अखबरनवीस. ६ कामाचे तयार केलेले कागद. ७ परलोकीं. ८ इंद्राचा सहवास ( स्वर्गलोकाची प्राप्ति. )

**७ नऊ रत्नें**:-- ( Nine Short Moral Stories; adapted from the choice readings in the Kindergarten System) सदर पुस्तकांत नऊ सुंदर व बोधप्रद गोष्टी लिहिलेल्या आहेत **किं. ८२.**

**८ डॉक्टर स्विफ्ट यांचे चरित्र**:-( स्विफ्ट यांच्या सुंदर तसबिरीसह ( Life of Dean Swift-with a fine portrait of the Dean ) प्रसिद्ध इंग्रज ग्रंथकार स्विफ्ट यांचे चरित्र अनेक विद्वान व रसिक गृहस्थांच्या सांगण्यावरून पुस्तकरूपानें छापलें आहे. स्विफ्ट याच्यासारखा चतुर व मार्मिक लेखक तसेंच कुशाग्रबुद्धीचा व मनुष्यस्वभावाचा ज्ञाता व राजकारणी पुरुष इंग्लंडांत देखील क्वचितच झाला असल्यामुळें त्याचें अपूर्व चरित्र आमच्या मराठी वाचकांस अत्यंत मनोरम व बोधप्रद वाटेल यांत शंका नाहीं. **किं. ८३**

**९ गलिव्हरचा वृत्तांत**, भाग १ ते ४: इंग्रजींत ' स्विफ्टस् गलिव्हर्स् ट्रॅव्हल्स् ' नांवाचें एक अतिशय मनोरंजक आणि तत्कालीन राज्यपद्धती-संबंधानें उपरोधिक भाषेंत लिहिलेलें सुंदर पुस्तक आहे. इंग्रजी वाङ्मय हा एक समुद्र कल्पिला तर त्यांतलें प्रस्तुत पुस्तक हें एक उज्वल रत्न म्हणतां येईल. अशा योग्यतेच्या या ग्रंथाचें हें भाषांतर कै. विष्णुशास्त्री चिपळुणकर यांच्या सांगण्यावरून तयार केलें आहे. यांचे ४ भाग असून प्रत्येक भाग इतका उत्कृष्ट वठला आहे कीं, हें चारी भाग हातचे संपविल्यावांचून मनुष्याच्यानें राहवतच नाहीं.

**१० गलिव्हरचा वृत्तांत**, भाग १ ला सचित्र:- यांत **लिलिपटच्या** सफरीचें वर्णन फार बहारीचें आहे. **किं. ८५.**

**११ गलिव्हरचा वृत्तांत**, भाग २ रा सचित्र:-यांत **बाबडिंगनागची** सफर आली असून तिचें वर्णनही वरीलप्रमाणें मनोरंजक आहे **किं. ८५**

**१२ गलिव्हरचा वृत्तांत**, भाग ३ रा सचित्र:- यांत **लापुटा** वगैरे देशाची सफर वर्णिली आहे. **किं. ८५.**

**१३ गलिव्हरचा वृत्तांत**, भाग ४ था सचित्र:--यांत **हूं हूं हूं** याचें वर्णन फारच मनोवेधक वठलें आहे. **किं. ८६.**

**१४ नवीन सचित्र इसापनीति**: नवीन भाषांतर, सचित्र, समग्र ग्रंथ, दोन भाग एकत्र मजबूत व सुरेख बायंडिंग केलेले. (Æsop's Fables New version, illustrated, handsomely bound ) सुप्रसिद्ध ग्रीक

नीतिवेत्ता इसाप यानें मूळ ग्रीक भाषेंत लिहिलेल्या या नीतिग्रंथाचीं सर्व युरोपियन भाषेंतून भाषांतरें झालीं आहेत व आज शेंकडों वर्षें हा ग्रंथ मुलांचें नीतिशिक्षणाचें पुस्तक म्हणून सर्वमान्य झालेला आहे. याचें मराठी भाषांतर प्रथम के. सदाशिव काशीनाथ छत्रे यांनीं केलें होतें. पण त्यांची भाषा हल्लींच्या काळाच्या मानानें जुनी व कांहींशी दुर्बोध ठरल्यावरून ती भाषा बदलून, त्यांतल्या तात्पर्यांची छाटाछाट करून व शिक्षणाच्या दृष्टीनें अवश्य असें दुसरे फेरफार करून ही सचित्र नवी आवृत्ति तयार केली आहे. व ती **मुंबई इलाखा** व मध्यप्रांत आणि **वऱ्हाड** येथील शिक्षणखात्याचे अधिकाऱ्यांस व इतर विद्वान् गृहस्थांसही मान्य झाली आहे, हे या पुस्तकाच्या पांच आवृत्त्या थोडक्याच अवधींत निघाल्या यावरून उघड दिसत आहे. पुस्तकास टाईप जाड वापरला असून चित्रें देशी पेहरावाचीं घातलीं आहेत. गोष्टी सुमारें २०० च्या वर असून **किंमत ८१४ आणे** आहे.

**१५ इसापनीति**, भाग १ ला: —नवीन सचित्र भाषांतर. **किं. ८६.**

**१६ इसापनीति**, भाग २ रा: नवीन सचित्र भाषांतर. **किं. ८६.**

**१७ नीतिबोधः**–( Adapted from Chamders' Moral Class Book and other sources ) नीतीवांचून मुलांचें शिक्षण म्हणजे प्राण निघून गेलेल्या कुडीप्रमाणें मातीमोल होत आहे. ही गोष्ट लक्षांत घेऊन हिंदुस्थान सरकारनें १८८९ सालीं उपदेश आणि उदाहरणें यांच्या द्वारें शाळांतून नीतिशिक्षण द्यावें असें ठरविलें. तो सरकारचा उद्देश ज्याच्या योगानें उत्कृष्ट प्रकारें सिद्धीला जाईल अशा प्रकारचें हें पुस्तक आहे. म्हणजे त्यांत लहानसहान नीतिपर निबंध असून त्या निबंधांचे विचार ज्यांत प्रतिबिंबित झाले आहेत अशा ऐतिहासिक पुरुषांच्या व इतर गोष्टी आहेत. देशाचा किंवा कालाचा भेदाभेद न ठेवतां गोष्टींची निवड केलेली आहे. मधूनमधून नीतिपर सोप्या कविताही घातल्या आहेत. या पुस्तकाची ही आठवी आवृत्ति आहे, यावरून पुस्तकाची उपयुक्तता लोकांना कशी पटली आहे तें दिसून येईल. **किं ८६.**

**१८ सायंकाळची करमणूकः**–( Adapted from the Evenings at Home )—संध्याकाळचे वेळीं पुराणाहून आल्यावर आजीबाई नातवंडांना पुराणांतील गोष्टी सांगून त्यांची करमणूक करीत व त्याबरोबर धर्म आणि नीति यांचा उपदेश करीत असत, ही आपली जुनी रीत प्रचारांतून अगदीं

गेली व शिक्षण शब्दाचा अर्थ अधिक व्यापक झाला. तथापि शिक्षणांत नवीन अंतर्भूत झालेलीं तत्त्वें लक्षांत घेऊन त्या जुन्या पद्धतीवर संध्याकाळीं मुलांची करमणूक करण्यासारख्या निरनिराळ्या विषयांवर गोष्टी संवाद लिहिले तर मुलें ते हौसेनें वाचतात असा अनुभव आल्यावरून त्या धोरणावर इंग्रजींतल्या 'ईव्हनिंग्ज् अॅट् होम्' का पुस्तकाच्या आधारानें या पुस्तकाची रचना केली आहे. पुस्तक प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय त्याच्या उपयुक्ततेची खरी कल्पना व्हावयाची नाहीं. म्हणून मुलांच्या पालकांनीं हें पुस्तक अवश्य पहावें. पाहिल्यावर ते घेणारच. **किं** ८६

१९ **शिक्षणसार** :—( Adapted from Todd's Students' Manual and other sources ) मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न दिवसेंदिवस बिकट होत चालला आहे. अशा वेळीं तरुणांना सन्मार्गदर्शक अशा पुस्तकांची अत्यंत जरूरी आहे. प्रस्तुतचें पुस्तक हें कार्य उत्तम प्रकारें बजावण्यास समर्थ आहे, हें या पुस्तकाचे वरवर अवलोकन करणारास सुद्धां सहज कळून येईल, हें पुस्तक इंग्रजींत टॉड्स स्टूडन्टस् म्यान्युअल या सुप्रसिद्ध पुस्तकाच्या आधारानें तयार केलें असून त्यांत विद्याभ्यासाचे उद्देश, संवयी, वाचन, सत्कालक्षेप आणि व्यायाम या विषयांसंबंधानें ६ उत्कृष्ट निबंध आहेत. **किं**. ८७.

२० **उत्तम शेतकरी**: - ( Genuine Farmer ) खेडेगांवांतल्या शाळांतून शिकणाऱ्या शेतकऱ्यांच्या मुलांना इतर सटरफटर गोष्टी वाचावयास देण्यापेक्षां ज्यायोगानें त्यांच्या धंद्यांत ते निष्णात होतील असें व्यवहार शिक्षणाचें पुस्तक देणें चांगलें, हें निर्विवाद आहे. मराठींत असें दुसरें पुस्तक नाहींच. **किं** ८२

**बाक्षिससमारंभाकरितां याच यादींतील पुस्तकें जास्तींत जास्त घेतली जावींत. कारण अशीं बुकें मुलांचे हातीं मिळाल्यानें त्यांचें भावी कल्याण केल्याचें श्रेय मिळणार आहे. व्यापारी कमिशन भरपूर मिळतें.**

मिळण्याचा पत्ता:—

**नवीन किताबखाना, बुधवार पेठ, पुणें सिटी.**

